श्रीराम.

# चांद्रसेनीय कायस्थप्रभु धर्माधिकार संग्रह.

Not for Lending

अमृतराव आबाजी कर्णीक यांणी केला

तो मुंबईत

रा. रा. नारायण मेघाजी लोखंडे यांच्या दीनबंधु छापखान्यांत

छापिला

सन १८९०।९१ शके १८१२,

1890-91.

आवृत्ति १ ली, प्रती २०००.



किंमत ५ रुपये



द्रकमलाकर ( शुद्रांचे धर्म आणि कर्में निश्चित करून कमलाकर भट्टांहीं लिहिलेला ) मेळवून पाहतां त्यांत असा ह्या दोनीही ग्रंथांत वर लिहिलेला कथाभाग ( ४७ अध्यायांतील ) आहे.

असे च्यार ठिकाणीचे लेख पाहून छापिलेलें रेणुका माहात्म्य पुरें नाहीं. असा निश्चय ठरवून त्याच्या दृढीकरणार्थ अनेक स्मृती, अनेक पुराणें, अनेक ग्रंथ ज्यांत धर्म संबंधी चर्चा केल्या आहेत असे पाहिले. त्यांत क्षत्रियांचीं कर्में वेदोक्त आढळलीं त्यावरून हा " **चांद्रसेनीय कायस्थ प्रभु धर्माधिकार संग्रह** " ग्रंथ लिहिला.

परंतु गागाभट्टाही संकरजकायस्थां करितां लिहिलेला ' **कायस्थ धर्मदीप** " या ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणांत " प्रथमतः या ग्रंथांत संकरजकायस्थांच्या धर्माकर्मांचें कथन करितों. पुढें कायस्थ प्रदीपांत चांद्रसेनीय कायस्थांचे धर्मवर्णीन " असें लिहून ठेविलें आहे. आणि काशीच्या विद्वानांच्या पत्रांत " अतएव गागाभट्टानी त्याच पद्धतींत वैदीक मंत्र स्पष्ट लिहिलेच आहेत " असेंही लिहिलें आहे. तो ग्रंथ आणि रेणुका माहात्म्याचे च्याळीसा पुढील अध्याय कोठें आहेत ते शोधण्याच्या यत्नास लागलों.

---

*सन १८७८।७९ सालीं राज० रा० आत्माराम भिकाजी उर्फ आपासाहेब इलचपूर कोर्ट परतवाडा येथें मुनसिफ असून तेथें राहणारे वकील लोक वगैरे पुष्कळ ब्राह्मणही होते. एके दिवसीं आपासाहेब यांजकडे श्री सत्यनारायण व्रत होऊन त्यांत कथा श्रवणास बहुत लोक जमले होते. आपासाहेबांकडे स्वयपाकास ब्राह्मण असून श्रीसत्यनारायणाचा प्रसाद स्कंदपुराण रेवाखंडोक्त विधिनें ब्राह्मणांकडून पक्व झाला असून प्रसाद देणारे ब्राह्मणच होते. तेथें प्रसाद दिला तो सर्वांहीं घेऊन विधिनें भक्षण ही केला. त्यांत दिनकर नारायण विध्वंस किंवा विद्वांस उपनामक आणि मोरो सखाराम बर्वे हे दोघे वकील कोकणस्थ चित्पावन ह्मणविणारे होते त्यांही तो प्रसाद घेतला असून तो न खातां टाकून दिला. आणि हा कां टाकिला असें अवांतर देशस्थ ब्राह्मणाहीं विचारितां हा परभुलोकांकडील असल्यामुळें आह्मी खाल्ला तर बाटूं—असीं भाषणें बोलून दाखविलीं. त्यावरून लोकांत बराच तंटा उपस्थित झाला होता. त्यांत मुख्यतत्व ज्या लोकांहीं प्रसाद भक्षण केला, त्यांस आणि वेदोक्त देवपूजा सांगणारा श्रीकृष्ण भट्ट देशस्थ यास जाती बाहेर टाकावे हें होतें. हें कृत्य धर्माधिकारी यांच्या अधिकारांतलें असून धर्माधिकारी राव बहादूर भगवंत नरहर देशपांडे प्रगणे इलचपूर व खोलापूर हे होते, त्यांजकडे दिनकर प्रभृति लोक

जाऊन करणें तो यत्न केला, परंतु तो त्याहीं चालूं दिला नाहीं आणि मागील बडे विष्णु गंगाधर नावाचा कौंकणस्थ चित्पावन ब्राह्मण याणें उपभोगार्थ परतवाड्यांत एक महारीण स्त्री ठेविली असून तें उघडकीस आल्यावर हें आपल्या कडून नक घडलें असें विष्णूचें म्हणणें पडल्यामुळें त्याजला आमच्या मान्यतेनें प्रायश्चित्त देवून तो च शुद्ध केला आहे, असें उदाहरण वदून असे तुह्मी चित्पावन त्यांचें मत प्रभू वेदाधिकारी त्यांजकडे पक्क झालेला तोही ब्राम्हणाहीं केलेला प्रसाद असतां त्यांच्या घरीं झाला इतकेंच कारण लावून तो ज्यांहीं भक्षण केला त्यांस व प्रभूकडे वैदीक कर्म चालविणारास बहिष्कार घालावा हें आम्हास मान्य नाहीं असेंहि सांगीतलें. असा चित्पावनांचा अत्याग्रह आहे.

वरतें लिहिलेल्या दोनी ग्रंथांचा शोध घेतां जेथें जेथें कौंकणस्थांचा संचार होऊन उपाय चालला तेथें तेथें रेणुका माहात्म्य चाळीस ४० अध्याय पर्यंतच आढळलें अधीक नाही. कित्येक काला नंतर वऱ्हाड प्रदेशांत लाडाचें कारंजें ह्मणून मोठें गांव आहे तेथें रेणूका माहात्म्याचें पुस्तक प्रऱ्हाद भट्ट नांवाच्या मनुष्या जवळ आहें. असें समजलें त्याजकडे जाऊन शोध करितां आहें असें कबूल झाला, पण देयीना. त्यावर कित्येक काल गेल्यावर आत्माराम भिकाजी एकस्ट्रा असिस्टेंट कमीशनर हे कारंजें कोर्टालीं मुनसिपीच्या कामीं गेलें तेव्हां त्यांजला ही खबर कळविली. त्याहीं प्रऱ्हाद भट्टाचें मन वळवून ५५ पंचावन्न अध्यायाचें रेणुका माहात्म्य आणि हेमाद्री प्रबंध नामक ग्रंथ असीं दोन पुस्तकें घेऊन सन १८८० इसवींत मजकडे अकोल्यास पाठविलीं.

ह्या पुस्तकां पैकीं "हेमाद्री प्रबंधाच्या" चोविसाव्या अध्यायांत उत्तर भागांत [illegible] कथा आहे. रेणुका माहात्म्यास अध्याय ५५ पंचावन आहेत तथापी चांद्रसेनीयांची कथा कोठेंही नाहीं. मात्र ४७ सत्तेचाळीसाव्या अध्यायांत एका पत्रावर मार्जनात व मधीं कांहीं हरताल घातलेला असून पुढें पत्रांचे व श्लोकांचे आंकडे खोडलेले आहेत. हा ग्रंथ शके १५६० सालचा लिहिलेला आहे असें त्याच्या शेवटीं लिहिलेलें [illegible] तो ग्रंथ आपल्या पासीं ठेऊन घेतला.

पुढें सन १८८१ इसवी सालीं हैद्राबाद (भागानगरी) येथें गेलों तेथें ८ आठ [illegible] शोध करितां एका द्रविड ब्राह्मणानें आपल्या जवळ रेणका महात्म्य आहें असें कबूल [illegible] त्याची प्रसन्नता साधून पुस्तक पाहतां द्राविडी लिपींत शके १४५० चवदाशें

पत्रासांत लिहिलेलें दिसलें. पुढें त्याच्या छंदानें चालून वाचून ऐकून कारंजाच्या व छापील पुस्तकांसीं रुजू घेतां क्वचित्पाठभेद परंतु कथाभाग बरोबर असे ३९ एकोन चाळीस अध्याय पर्यंत मिळाले. चाळीसावे अध्याया पासून कथा भागांत विसंगती होऊन कारंजाच्या प्रतीसीं बरोबर चालले. पुढें शेवटा पावेतों रुजू घेतां ४१ एकेचाळीसाव्या आणि ४७ सत्ते चाळीसाव्यांत मात्र कांहीं कमी अधीक असून वरकड बरोबर आहे असें पाहिलें. नंतर च्याळीस पासून आरंभून त्याणी वाचावें तें ऐकून मी लिहावें असे १६ सोळा अध्याय लिहून घेतले त्यांत चंद्रसेन आणि परशुरामाचें युद्ध ४१ एकेचालीसाव्यांत आणि चांद्रसेनीयाची उत्पत्ती व धर्मकर्में हीं सत्तेचाळी ४७ साव्यांत असे दोन कथा भाग कारंजाच्या प्रतीहून अधीक त्या प्रतींत निघाल्यानें निश्चय दृढ झाला. हे सोळा अध्याय मजपासीं असून बुकांतील ( मुंबईत छापिलेल्यांतील. ) ३९ एकोनचाळीस व कारंजे आणि द्रविडांतील प्रतींतील १६ मिळून ५५ पंचावन अध्याय एकत्र लिहून तयार केलेला ग्रंथही मजपासीं आहे.

ज्या मी आर्या केल्या आहेत त्यांचा व जे इतर ग्रंथांचे आधार व ठराव घेतले आहेत त्यांचा अर्थ मराठींत केल्यासहीत लिहून तयार केला तो हा " **चांद्रसेनीय कायस्थ प्रभू धर्माधिकार संग्रह** ' ग्रंथ आहे.

यांत तीन अध्याय आहेत. पहिले अध्यायांत पृथ्वी निःक्षत्रिय संशय निरसन, क्षत्रिय वर्णांत चांद्रसेनीय कायस्थप्रभुकुलाची उत्पत्ती, आणि वेदोक्त कर्माधिकार, यांचें कथन केलें आहें. दुसरे अध्यायांत या कुलास वेद, शाखा, सूत्र, प्रवर, गोत्रें, उपनामें आणि अपभ्रंशोक्त कांहीं उपनामें यांचें कथन केलें आहे. तीसरे अध्यायांत विवाद उत्पत्ती कारण सहीत काल, धर्मास दोष देणारे विवादक जन यांस पराजय, जयपत्रें मिळविलेलीं आणि अनुलोम प्रतिलोम जाती कशा, त्यांचें कथन केलें आहे.

हा छापून प्रसिद्ध करण्यापूर्वी गागाभट्टकृत "**कायस्थ प्रदीप**" ग्रंथ मिळाला पाहिजे असी इच्छा होती ती ईश्वर कृपेनें शके १८१० अठराशें दहा सन १८८८ इसवी सालांत तो ग्रंथ टकले कुलाचार्यांच्या जुन्या ग्रंथांत सांपडला तेव्हां पूरी झाली. तो संक्षिप्त वेदमंत्र लिहिलेला आहे ह्मणून त्याची प्रत सविस्तर वेदमंत्र मी स्वतः लिहून तयार करून सर्व चांद्रसेनीय कायस्थ प्रभू यांच्या विशेषतः स्वकुलजांच्या हिताकरितां आपल्या जवळ ठेविली आहे.

हातीं धरिलेला उद्योग ईश्वरानें साह्य करून सिद्धीस नेला असें मानून हा **"चांद्रसेनीय कायस्थ प्रभु धर्माधिकार संग्रह"** ग्रंथ छापून प्रसिद्ध करितों. हा सकल चांद्रसेनीय कायस्थ प्रभू यांहीं लक्षपूर्वक वाचून लक्षांत ठेऊन तदनुसार आचार ठेवावा. असी ग्रंथकर्त्याची विनंती आहे.

ह्या ग्रंथांत पाहिले अध्यायांत सूर्यवंशाचें वर्णन केलें आहे त्याणें पाठारीय प्रभू जे ते सूर्यवंशी क्षत्रिय. ज्यांस सांप्रत पाताणे प्रभू ह्मणतात ते अन्यत्र असें दिसतें आणि ह्यांच्या संबंधानेंही चित्पावनाहीं घरेंच तंटे केल्याचा आढळ होतो त्यांसही ह्या ग्रंथांत निश्चित केलेले क्षत्रिय वर्णाचे नियम आणि लेखनादीक धर्म असावेत असें होतें.

**अमृतराव आबाजी कर्णीक, देशपांडे कुळकर्णी**

तर्फ नाणेमावळ–ग्रंथकार.

**विशेष सूचनाः**—चांद्रसेनीय कायस्थ प्रभू हे शुद्ध क्षत्रिय वंश आहेत यामुळें यांचा आचार कसा असला पाहिजे याविषयीं विशेष लिहिणें अवश्य.

क्षत्रियवर्ण द्विज होय, द्विजत्व उपनयनानें प्राप्त होतें. उपनयनाचें मुख्य तत्व गायत्री वेदमाता जी सावित्री तीचा उपदेश पित्यानें तदभावीं शास्त्रसंमत अधिकाऱ्यानें देणें हें होय. हा उपदेश झाला ह्मणजे वेदाधिकारी ब्राह्मण्य झाला. त्याणे श्रुतिस्मृतीनें सांगीतलेला आचार ठेविला पाहिजे. ह्या आचारांचा विस्तार स्मृतींत आचाराध्याय आहेत ते (मनु, याज्ञवल्क्य आदिकरून स्मृतींत) अवश्य पाहावे आणि तदनुसार आचार ठेवावा. त्यांतून अवश्य जें कर्तव्य तें थोडक्यांत सांगतों.

ब्राह्मण्यांत (वेदशास्त्र कथितार्थांत) विध्युक्तप्रातःकर्म स्नान संध्या (रात्र आणि दिवसाचा संधी) कर्म. प्रातःकालांत अग्निकर्म. संगवकालांत वेदाध्यायन कर्म. मध्यान्हकालांत पंचमहायज्ञ. ब्रह्मयज्ञ. देवयज्ञ. भूतयज्ञ अपराण्हकाळांत पितृयज्ञ. मनुष्ययज्ञ. असे पांचयज्ञ केलेच पाहिजेत. तसेंच सायंकाळांत सायमसंध्या (दिवस आणि रात्रीचा संधी) कर्म. हीं न केलीं तर धर्म मलीन होतो आणि त्यापासून इह आणि परलोक सुखाची हानी होते. हे पंचमहायज्ञ कसे तें थोड्यांत कथन. १ ब्रह्मयज्ञ. चतुर्वेदसांग, षट्शास्त्रें, पुराणें (इतिहास) सर्व ह्मणण्यास काल अल्प याकरितां प्रत्येक वेदांतील, वेदांग ग्रंथांतील, शास्त्रांतील, पुराणांतील, थोडाथोडा उच्चार घेऊन प्रथना केली आहे तो व देव.

ऋषि. आचार्य. यांस तर्पण (तृप्तिकरणोदक देणें) तसेंच पितृतर्पण, पर्यंत हा पहिला, ब्रह्म ह्मणजे वेदयज्ञ. २ देवयज्ञ, वैश्वदेव विधि पैकीं पहिला. (अग्निवर सूर्यादि देवतांस अन्नाच्या आहुती देणें.) ३ भूतयज्ञ, वैश्वदेव विधि पैकीं दुसरा (वर्तूल अथवा अन्यो-करीत्या त्या मंडलावर आहुती देणें.) ४ पितृयज्ञ (पितरांस आहुती अपसव्यानें स्वधा उच्चार करून पितृतीर्थानें देणें.) ५ अतिथी पाहून त्यास भोजन देणें हा मनुष्ययज्ञ. असे पांच महायज्ञ. मनु, याज्ञवल्क्य, पाराशरादि स्मृतींत सांगितलेले धर्मसिंधूकार काशीनाथोपाध्याय यांही लोको-पदेशार्थ स्पष्टकरून दाखविले आहेत ते पाहून तेवढे तरी अवश्य केलेच पाहिजेत. या सर्वांस सावकाश केले तर २० मिनुटें लागतात.

कित्येकांचें मत हे केले ह्मणजे यांचीं फळें तत्काळ कां होत नाहींत. मग हे करून फळ आहे हें कसें. या विषयीं इतकेंच सांगणें. सर्व मनुष्यें सारखींच आहेत परंतु प्रत्ये-कास सुखा दुःखाची प्राप्ती वेगळी आहे. कारण कर्मफल (प्राक्तन)

जसें बीज तसें फळ उत्पन्न होतें हें आपले प्रत्ययास येतें. परंतु जेव्हां हा प्रत्यय येतो तेव्हां फळ हातीं घेतल्यावर त्याचें उत्पादक बीज याच्यांसी मिळऊन पाहूं ह्मटलें तर तें बीज नाशास पावलें असल्यामुळें हातीं घेण्यास मिळत नाहीं. तात्पर्य बीज अदृष्ट झाल्यावा-चून फळ उत्पत्ती नाहीं. फळासीं मिळविण्यास बीज सापडलें नाहीं ह्मणून बीज नव्हतें असें म्हणतां येणार नाहीं. जसें फल बीज नाश पावल्या शिवाय फळ दिसण्यांत येत नाहीं तसें कर्त्या या देहाचा नाश झाल्यावाचून भोक्तया देहाची उत्पत्ती नाही.

क्षत्रिय आपला वेद [ ब्रह्म ] धर्म चालविण्यास राज्य शासनादीक व्यावृत्ती मुळें ब्राम्हण (वेदाचाच धर्म चालविणारा वर्ग विश्वामित्र अघमर्षणादिका प्रमाणे धारणेचे) यांजकडून करऊं लागले. पुढें होतां होतां आपला ब्राम्हण धर्म नव्हे असी बुद्धी होत चालल्यामुळें ते होयीनांत यामुळें पृथ्वी शासनादीक अधिकार नष्ट झाले. आतां रिकामे पणांत तरी आपले वडीलाचरित सुखद कर्म कर्ण्यास ह्मटून तें केलें असतां बीज भूत फळ [ देहा ] च्या नाशांतीं कर्म फल प्राप्ती होयीलच हें निश्चायक आहे.

फल प्राप्ती दोन प्रकारें आहे. निष्काम कर्म ह्मणजे ईश्वरार्पण केलें तर मुक्ती, आणि कामनीक कर्म केलें तर त्या करितां अन्य जन्म घेऊन त्या जन्मी भुक्ती प्राप्त होते.

हा विचार मनांत न आणितां सद्यः फल इच्छिणारे नास्तिक मतानुसारी होतात तसे न होतां कर्मी भक्ती ठेऊन स्वधर्माचरण करावें हाच मार्ग विहित होय. अतएव याचें अवलंबन करून चालावें हें परम श्रेयस्कर. तसे न चालून अनहितकारी लोकांच्या शिक्षेनें आपल्या धर्म कर्माची माहिती त्यांपासून आपल्यास होण्याचा प्रसंग आल्यामुळें या ज्ञातीस हीनत्व कल्पिण्यास कारण झालें आहे. या मागील लोकांस वेद शास्त्र विद्यागूढ होती आतांच्या लोकांस विद्वत्व प्राप्त होत चाललें आहे. या विद्येचें सार्थक स्वधर्मोत्तेजन करण्यास आळस न करितां उत्तम कुल आरशास हीन कर्म बुरसा लागला आहे तो पुनः स्वधर्मोत्तजनानें पुसून स्वात्म दर्शन करून घ्यावें. हेंच ग्रंथ कर्त्याचें मागणें आहे.

अमृतराव आबाजी.

ग्रंथकर्ता.

श्रीराम.

## या ग्रंथास मान्यता दिलेल्या लोकांच्या असल पत्रांतील उतारा व नकल.

१ श्रीमच्चांद्रसेनीय कायस्थ प्रभु कुलाचार्य कैलासवासी **आबाशास्त्री टकले चित्तपावन** यांच्या कुलांतील औरस संतती, वेदशास्त्र संपन्न राजश्री काशीनाथ सिद्धेश्वर, धारेस आहेत त्यांच्या मिती माघ वद्य ८ अष्टमी शनवार शके १८१० सर्वधारीनाम संवत्सराच्या पत्रांतील उतारा,—

" स्वस्ति श्री गोब्राह्मण प्रतिपालक निजधर्मपरायणैक चिरंजीव राजश्री अमृतराव आबाजी देशपांडे कुळकर्णी तर्फ नाणे मावळ यांस, शुभचिंतक काशिनाथ सिद्धेश्वर शास्त्री टकले चांद्रसेनीय कायस्थ प्रभु कुलाचार्य मुकाम किलेधार हल्लीं मुक्काम संस्थान देवास याचा आशीर्वाद.

वेदमूर्ती सकलशास्त्रसंपन्न श्रीमद्गागाभट्ट पंडितोत्तम यांचा कृत **कायस्थ धर्मप्रदीप** ग्रंथ तुह्मी वेदमंत्र सविस्तर लिहून तयार केला तो व तुह्मी तुमचे कुला [ चांद्रसेनीय कायस्थ प्रभु ] स माहिती व्हावी ह्मणून रचिलेला ग्रंथ पाहिला. ह्यांत तुमचें परिश्रमाचा विचार करून पाहतां संतोष झाला कीं, तुह्मी आपल्या धर्माकर्मास जपून चालण्या व चालवि-

ण्यास ह्मटत आहों हा तुमचे ज्ञातीचे सर्व लोकांस सन्मार्ग दाखविण्याचा यत्न तो स्तुत्य आहे. आतां तुमच्या परिश्रमा प्रमाणें तुमचे ज्ञातीयांहीं सर्वांनीं यांचा संग्रह करून तदनुरूप आचार ठेविल्यास सर्वांस श्रेयस्कर आहे. पुढें दुसरामजकूर आहे. भवदाभिलषितंभवतु, हा आशीर्वाद. **काशीनाथ सिद्धेश्वर टकले,** हस्ताक्षर खुद.

२ श्रीक्षेत्रजनस्थान [ नाशीक ] येथील चांद्रसेनीय कायस्थ प्रभु - कुलाचे तीर्थ उपाध्याय कैलासवासी अकंभट्ट क्षेमकल्याणी यजुर्वेदी यांच्या वंशजांच्या पत्राची नकल.

स्वस्ति श्री विराजित चिरंजीव राजश्री अमृतराव आबाजी कर्णीक देशपांडे तर्फ नाणे मावळ यांस. गंगाधर भट्ट मुरार भट्ट व सखाराम भट्ट सीताराम भट्ट क्षेम कल्याणी चांद्रसेनीय ज्ञातीचे उपाध्याय वास्तव्य श्री क्षेत्र जनस्थान यांचा वेदोक्त आशीर्वाद विशेष **तुम्ही आपल्या ज्ञातीस वेदोक्त कर्माधिकार** आहे असा **गागाभट्टकृत कायस्थ धर्म प्रदीप आणि श्री रेणुकामाहात्म्य** हे ग्रंथ मिळवून तुह्मी स्वतः रचिलेला ग्रंथ ' **चांद्रसेनीय-कायस्थप्रभु धर्माधिकार संग्रह** ' हे तीनही ग्रंथ काल तुह्मीं आपल्या ज्ञातीयांस दाखवून तत्संबंधीं भरलेल्या सभेंत व्याख्यान दिलें तें आम्ही आयकिलें आणि तीनही ग्रंथ पाहिले. तुमचें कृत्य आपल्या ज्ञातीचा धर्म संरक्षण करण्या करितां मोठी मेहनत घेऊन आहें असें पाहून आम्हास संतोष झाला. आतां तुमचे ज्ञातीयांहीं या तुमचे संग्रहा ग्रंथाचा संग्रहं करून त्या प्रमाणें चालावें हें परम योग्य आणि इष्ट आहे. हे ग्रंथ तुह्मी छापिले ह्मणजे यांची एक एक प्रत आह्मा पासीं दिली पाहिजे, कळावें हा आशीर्वाद. मिती वैशाख शुद्ध ४ चतुर्थी शके १८१२.

**१ सही गंगाधर भट्ट मुरार भट्ट क्षेम कल्याणी दस्तुरखुद.**

**२ सखाराम सीताराम क्षेम कल्याण दस्तुरखुद.**

श्रीगणेशायनमः श्रीराम.

# अथ चांद्रसेनीय कायस्थप्रभु धर्माधिकार संग्रह.

**संहिता.—श्रीमन्मंगल मूर्ति गणराज सरस्वतीश विघ्नाचा ।**
**हर्ता जो त्यास नमुनि अवलंबीं मार्ग तो अविघ्नाचा. १**

**अर्थ आणि संगती.**—श्रीमंत, मंगल मूर्ति, गणराज सरस्वतीचा ईश (सरस्वतीच्या आधीं ज्याचें स्मरण केलेंच पाहिजे, त्याच्या स्मरणा वाचून सरस्वती संतुष्ट होत नाहीं यास्तव सरस्वतीचा ईश) विघ्नाचा हर्ता, असा जो त्यास नमस्कार करून अविघ्नाचा मार्ग धरितों. १

**श्रीशारदा सुवरदा यश-बुद्धि-स्फूर्तिदा तिला भावें ।**
**नमुनि सदां याचींकीं अति निर्मलत्वत्पदाब्ज लाभावें. २**

उत्तम वर देणारी, यश, बुद्धि आणि स्फूर्ति देणारी जी श्रीशारदा, तील भावानें नमस्कार करून अति निर्मल जें तुझें पदकमल तें सदां प्राप्त व्हावें असें मागतों. २

**श्रीईश्वरा सदाद्या नमितों तुज ऐक्य भावनेनें हो ।**
**कर्ता प्रसाद दासा लयास या नैक्य भावने नेहो. ३**

उत्तमामध्यें सर्वांहून पूर्वीचा त्यास, हे ईश्वरा तुला एक भावानें नमस्कार करितों. आणि तूं दासास प्रसाद कर्ता हो आणि द्विधा भावना जी तीला लयास ने (असी प्रार्थना करितों). ३

**श्रीगौरी श्रीविद्ये श्रीजगदंबे नमूनि हरिमाये ।**
**प्रार्थी सत्कार्या या प्रसादिं अवकाश तूं न धरि माये. ४**

हे श्रीगौरी, श्रीविद्ये, श्रीजगदंबे, हरिमाये तुजला नमस्कार करून प्रार्थीत आहें. हे आई या चांगल्या कार्याला प्रसंन होण्याविषयीं तूं अवकाश धरूं नको. ४

**श्रीमत्पुराणपुरुषा अरि कंबु गदा युधांकरीं धर्त्या ।**
**नमितों अनन्यभावें तारी संसारदुःख संहर्त्या. ५**

श्रीमान्पुराणपुरुष चक्र शंख गदा या आयुधांस हातीं धरणारा त्यास अनन्यभावें नमितों कीं, हे संसार दुःखाच्या नाशका मला तार.

**श्रीमद्गुरुनाथाला नमितों भवजलधि तारकाल्लाहो।**
**तत्पदरज प्रसादें अघटित घटनाधिकार मज व्हावो. ६**

श्रीमान् गुरुनाथ भवसमुद्रांतून तारणाराला मी नमस्कार करितों. अहो त्याच्या पायधुळीच्या प्रसादानें अघटित घडविण्याचा अधिकार मला प्राप्त होवो.

**श्रीमदमृतांशुसेन राजर्ष्यान्वय प्रभूत्तम कुलातें।**
**वर्णूतद्धर्मातें आणि तदधिकार यांहि सकलांतें. ७**

श्रीमान् अमृत आंशु (चंद्र) सेन राजऋषीचा वंश उत्तम प्रभुकुल त्यास त्यांच्या धर्मास आणि त्यांच्या अधिकारास या सर्वांस आतां वर्णू. ७

**श्रीमद्ब्रह्मसनातन रूपातें वर्णिलें श्रुतीनें तें।**
**श्री पुरुषसूक्त पाहूं पठणें जें सर्व अघ लया नेतें. ८**

श्रीमान् सनातन ब्रह्म जें त्याच्या रूपास वेदांनीं वर्णिलें तें श्री पुरुषसूक्त पठन केल्यानें सर्व पातक लयास नेतें तें पाहूं. ८

**आद्रि श्लोक श्रुतिचा त्या अंतीं वाक्य जी श्रुती आहे।**
**ये साध्या ऋषयश्च त्या श्रुतितें पाहतां स्मृती लाहे. ९**

पुरुषसूक्त वेद जो त्याची सातवी श्रुति (श्लोक) हीच्या शेवटीं जें वेद वाक्य आहे तें "**साध्या ऋषयश्च ये**" (साध्य ऋषी जे ते) या वाक्या (श्रुती) ला पाहिलें ह्मणजे स्मरण होतें. ९

**श्रुतिः—तंयज्ञंबर्हिषिप्रौक्षंपुरुषंजातमग्रतः**
**तेनदेवाऽअयजंतः साध्याऋषयश्चये. ७**

**श्रुतिसारअर्थ.**—प्रथम जें पुरुष रूप उत्पन्न झालें त्या रूपानें ईश्वरास देव, साध्य, ऋषी जे आहेत ते यजितात. (भजतात, पूजितात.) ७

**संहिता.—देवर्षि सर्वही त्या रूपा करितांचि जाहले असती।**
**तेथें ब्रह्मर्ष्युचहि राजर्षी नीच हे कसे असती. १०**

**अर्थ आणि संगती.**—देव, साध्य, ऋषी त्या रूपाला यजण्या करितांच झाले आहेत तेथें ब्रम्हर्षी हे उंच आणि राजर्षी हे नीच असे हे कसे असतील. १०

**पाहा श्रुति बारावी जींत चतुर्वर्ण वर्णिले तीतें ।**
**नच अन्य बुद्धि पितरीं उचनिचा वास एक देती तें. ११**

जींत चार वर्ण वर्णिले आहेत तीचा अर्थ सर्व जनक ( सर्वांचे जनन करणारीं आहे ) सर्वांचें जन्म कर्ता बाप होय त्याच्या ठायीं उच्च नीच पणाची बुद्धी नाहींच. लहान मोठ्यांस एक सारखे मानून समान वागणारी आहे. अशा अर्थाची श्रुती त्या बाराव्या श्रुतीला पहा. ११

**अस्य मुखासीद्ब्राह्मण बाहू राजन्य त्या. रुपीं केले ।**
**वैश्योरुभाग पादां करितां तरि शूद्र कीं वृथा गेले. १२**

ज्याचें मुख आहे ब्राम्हण, त्याच्या रूपीं क्षत्रिय बाहू केले, मांड्या हा भाग ज्याचा वैश्य, पायां करितां शूद्र केले आहेत तर तीन मात्र कामाचे आहेत आणि शूद्र फुकट गेले काय ? १२

श्रुति.—ब्राम्हणोस्यमुखमासीद्बाहूराजन्यः कृतः
ऊरूतदस्य यद्वैश्यः पभ्द्यांशूद्रो अजायत. १२

श्रुतिसार. अर्थ.—ज्याचें मुख आहे ब्राम्हण, बाहू क्षत्रिय केला त्याचे ऊरु ( मांड्या ) जें ( अंग ) तो वैश्य, पायां करितां शूद्र झाला १२. एथें श्रुतीचा अर्थ केलेला भिन्न दिसतो. सर्व स्मृती, पुराणें, [ इतिहास ] यांत चतुर्वर्ण उत्पत्तीचें वर्णन करणें झालें तेथें पत् [ पाय ] या दकारांत शद्बाचें पंचमीच्या द्विवचनाचें रूप " पभ्द्यां " असेंकरून विभक्ती लावितां पादद्वयां [ दोन पायां ] पासून उत्पन्न झाले असा चतुर्थ चरणाचा अर्थ घेऊन श्लोकाच्या शेवटच्या पदांत जें रूप कल्पिलें आणि अर्थ केला आहे तसा वरील तीन चरणांतील शद्बांचा अर्थ करून मुखा पासून ब्राह्मण, बाहू पासून क्षत्रिय, मांड्या पासून वैश्य, आणि पायांपासून शूद्र असाच केलेला दिसतो. आणि येथें चतुर्थीचा अर्थ केला आहे. तस्मात् हें करणें अर्थ आहे, असें साहजीक दिसतें. यास्तव उपपत्ती करणें योग्य आणि अवश्य आहे. ती.

हा अर्थ टीका काराहीं केला आहे. वस्तुतः प्राचीन ग्रंथकार बहूत झाले त्याहीं हा प्रकारच्या वर्णनांत " पभ्द्यां " या शद्बाचा उपयोग सर्व ठिकाणीं केला आहे. परंतु त्याच अर्थपर ( तोच अर्थ जींत निघतो चतुर्थीचा निघत नाहीं ) असी संहिता

कोणी लिहिली असें आढळत नाहीं. कदाचित आढळलें तरीं पूर्वापर संबंधानें जो अर्थ निघल तोच करणें योग्य आहे आणि ज्या करितां जी वस्तु उत्पन्न झाली ती त्या पासून उत्पन्न झाली. उदाहरणें. अंबरीश याच्या शापा करितां देवास अवतार घ्यावे लागले हे अवतार शापा पासून झाले. १ राम रावणास मारण्या करितां उत्पन्न झाला हा उत्पन्न होण्यास कारण रावणा पासून झालें. २ उलट. बापा पासून लेक [ पुत्र ] उत्पन्न झाला हा बापास नरक, आणि क्लेश यां पासून उद्धरण्या करितां झाला, अशीं बहूत निघतात. असें मानिलें तरी ज्या पासून उत्पन्न झाली तो त्या वस्तुच्या होण्यास कारण झालाच तसेंच ज्या पासून झाली ती त्या करितांच. या अर्थानें घेतलें असतां ही चतुर्थीच विभक्ति बरी लागते. सर्व स्मृतीचे अर्थकार ह्यानी पद्भ्यां या शब्दाचें पंचमीचें रूप केलें आहें त्याहून चतुर्थीचें रूप समजल्यानें अर्थ संयुक्त निघतो. मागील संबंध आतां पुढें घेतलेला पहा.:—पुरुषसूक्तश्रुति ११ श्लो. यत्पुरुषंव्यदधुः कतिधा व्यकल्पयन् । मुखंकिमस्यकौबाहूकाऊरूपादाउच्येते. या श्रुतींत उत्तरार्धांत याचें मुख कोण, बाहू कोण, ऊरु [ मांड्या ] कोण, पाय कोण ह्मणतात. किंवा सांगु. असा अर्थ निघतो. यांत मुखापासून कोण आदि करून पंचमीचा संबंध नाहीं. प्रथमेचा संबंध तत्पुरुष आहे.

ब्राह्मण क्षत्रिय सर्व कश्यपादि ऋषी पासून झाले असें पुराण प्रसिद्ध आहें त्यास पंचमीच्या अर्थानें बाध येतो इतक्या करितां चतुर्थी विभक्ती मानून अर्थ करणें हेंच योग्य आहें.

ईश्वरानें रूप धारण केलें त्याचे अवयवांचीं कर्में कोणी करावीं असें निश्चित केलें त्यांत यजन [ स्वतः कर्म यज्ञ करणें ] याजन [ दुसऱ्या करितां आचार्य होऊन कर्म यज्ञ करणें ] अध्ययन [ वेदशास्त्र पुराण शिकणें ] अध्यपन [ वेदादिक शिकविणें ] भक्षण करणें हीं कर्में ब्राह्मणानें करावीं. यजन [ वरतें अर्थ दिला आहे ह्यांत अग्निहोत्रादिक सर्व कर्मयज्ञ येतात. ] अध्ययन [ वरतें अर्थ दिला आहे, ] संरक्षण [ ईश्वराचें शरीर प्रजा रूप सम्यग्रक्षण करणें ह्यांत धनुर्धारण, शासन, आदिकरून येतात ] हीं कर्में क्षत्रियानें करावीं. मांड्याचें कर्म वैश्यानें करावें. पायांचें कर्म शूद्रानी करावें. असें नियम केलेले सर्व मनुष्य देही [ देहधारण करणारे मनुष्य ] यांस अनुभवास येत आहें. ईश्वर रूपाचीं कर्में विभागून ज्या इंद्रियाचीं कर्में ज्यांजकडे दिलीं त्यांजला त्या करितां उ-

त्पन्न केले असें जितकें संयुक्तिक दिसतें तितकें त्यां पासून झाले [ उत्पन्न झाले ] असें संयुक्तिक दिसत नाहीं.

ह्या वेगळी आणखी एक गोष्ट आहे. जो बारावा श्लोक आहे त्यांत पाहिले पादांतील अकर्मक आणि दुसरे पादांतील सकर्मक क्रियापदें आहेत. ह्या आहे, आणि केला. ह्या दोनी ही क्रियापदांचा लोप होत आहे. आणि त्या वेगळा अर्थ होत आहे.

ह्यास्तवही चतुर्थी विभक्ती लावणें योग्य आहे. ती लाऊन अर्थ होय असा शब्द काव्यांत घेतला आहे, तो अर्थ नाहीं. भीष्मस्तवराज—श्लोक. ब्रम्हवक्रंभुजौक्षत्रंकृत्स्नमूरूदरंविशः । पादौयस्याश्रिताःशूद्रास्तस्मैवर्णात्मनेनमः ६७

श्रीमद्भागवत् द्वितीयस्कंध अध्याय १ ब्रम्हाननंक्षत्रभुजो महात्मा विडूरुरंघ्रिश्रितकृष्णवर्णः नानाभिधाभीज्यगणोपपन्नो द्रव्यात्मकः कर्मवितान योगः ३७ अध्याय ९ पुरुषस्यमुखंब्रम्ह क्षत्रमेतस्यबाहवः उर्वोर्वैश्योभगवतः पद्भ्यांशूद्रोऽभ्यजायत ३७

**ईश्वररूपीं चारहिवर्ण विभागुनि घेतले जेव्हां ।**
**उपयोगीं आणि निरुपयोगीं कोणी न राहिले तेव्हां　१३**

जेव्हां ईश्वर रूपाच्या ठायीं चारही वर्ण वाटून घेतले आहेत तेव्हां कोणी उपयोगीं आणि कोणी निरुपयोगीं असे राहिले नाहींत. १३

**देवातृप्त कराया ब्राम्हण जो ब्रम्हनिष्ठ्तो योजा ।**
**यज्ञभया शमवाया शस्त्री पाहूनि प्रार्थिजे राजा　१४**

देवाला तृप्त करण्याकरितां ब्रह्मनिष्ट ब्राह्मण [ ज्याची निष्ठा ब्रह्माच्या ठायीं जडली आहे; मानापमानीं, मित्रशत्रुपक्षीं सम, सर्वारंभाचा त्याग केला आहे आणि गुणा पासून ह्मणजे त्रिगुणांच्या बंधा पासून वेगळा झाला आहे असा ] पाहून योजावा त्याजकडून यज्ञाचें काम करवून शेवटीं संतर्पणांत ब्राह्मण भोजन करवावें. असें केल्यानें देव तृप्त होतो. यज्ञ करूं लागले ह्मणजे त्यांला राक्षसादिक उपद्रव करून यज्ञ मोडितात, राहवितात तें भय नाहींसें करण्याला शस्त्रधर क्षत्रिय पाहून तो योजावा ह्मणजे भय शमतें. विश्वामित्र महाधनुर्धर क्षत्रिय होता परंतु ब्रह्मकर्म करणें पत्करिलें तेव्हां क्रूरकर्म त्याग केला आणि यज्ञ करूं लागले तेथें सुबाहु, मारीच राक्षस विघ्न करूं लागले तें त्याचानें शमन होईना

म्हणून दशरथा पासून राम लक्ष्मण मागून घेऊन त्यांस धनुर्वेद शिकवून त्यांजकडून राक्षसांचें भय निवारण केलें.

**यज्ञोपयुक्त [redacted] ।**
**सेवेस शूद्र [redacted]**

यज्ञाला उप[redacted]न द्रव्यें पाहिजेत तीं आणि इतर व्यवहारीक द्र[redacted] साहित्य कुंडमंडप समिधा यांचे कामांत माती लांकडें [redacted] सर्व प्रकारें भार वाहणें यांस शूद्र योजावा असे जें [redacted]र्णित केलेली ईश्वराची उक्ती.

[redacted]

**शमो दमस्त[redacted]**
**ज्ञानं विज्ञा[redacted] ४२**

शम, दम, त[redacted] आस्तिक्य, हें ब्राह्मणाचें स्वभावापासून झालेलें [redacted] तीसऱ्या अध्यायांत २ आंवें-खाली केलेला आहे [redacted]

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धेचाप्यपलायनं**
**दानमीश्वर भावश्च क्षात्रंकर्म स्वभावजं. ४३**

शूरत्व, तेज, धीर, दक्षता, युद्धांतही अपराङ्मुखता, दान, ईश्वराचे ठायीं ( किंवा ईश्वराचा ) भाव ठेवणें. हें क्षत्रियाचें स्वभावापासून झालेलें कर्म. ४३

**कृषि गोरक्ष वाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजं**
**परिचर्यात्मकंकर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ४४**

कृषि (सेतकी करणें) गोरक्ष [ गाई बाळगणें राखणें ] दुकानदारी हें वैश्याचें आणि सेवा करण्याचें काम करणें हें शूद्राचेंही स्वभावापासून झालेलें कर्म. ४४

**यज्ञोपयुक्त कर्मा योग्य चतुर्वर्ण वदति वेदस्मृती ।**
**सकल पुराणींहि असें वर्णित तें पाहतां पडेल स्मृती १६**

यज्ञाच्या उपयोगी असे कामास चारीही वर्ण योग्य आहेत असे वेद शास्त्रें म्हणतात, सर्व पुराणांतही असेंच वर्णिलेलें आहे तें पाहिलें म्हणजे स्मरण होईल. १६

त्यांत सदाचरणीही तरिं विट्शूद्रां नचाप्त ऋपिता हो ॥
विप्रा क्षत्रिय वर्णा मात्र असे प्राप्त वेदस्मृतिनाहो ॥ १७

अहो या चार वर्णांत जरी चांगले आचार करणारा असा झाला तरी वैश्य आणि शूद्र यांत ऋषिपणा प्राप्त होत नाहीं. ब्राह्मण, क्षत्रि, यांस मात्र प्राप्त आहे असें वेदशास्त्रांत आहें. १७

श्रीमच्छंकर कथिता इतिहासा लागिं ज्या वदे स्कंद ॥
अष्टादश नामें जीं असति पुराणांस त्यांत हें स्कंद ॥ १८

पुराणें जीं अठरा आहेंत त्यांची वेगळालीं नांवें आहेंत [ मत्स्य, कूर्म, अग्नि, ब्रह्म वैवर्त, भविष्य, स्कंद आदिकरून ] त्यांत श्रीमान शंकर देवाधिदेव याणी जो इतिहास सांगितला जो श्रीस्कंद [ षडानन ] याणी सनत्कुमार यांस सांगितला तो ह्या अठरांतील स्कंद या नांवाचें आहे. १८

त्यामाजी बहु खंडें त्यांतिल सह्याद्रि नामकीं खंडीं।
सकलोत्पत्ति सविस्तर वदला हर सर्व जें असे अंडीं. १९

त्यांत पुष्कळ खंडें [ सृष्टीखंड, ब्रह्मोत्तर खंड, सह्याद्रि खंड, आणखीही ] आहेत त्यांतलें सह्याद्रि नामक खंड आहें. त्यांत सकळांची उत्पत्ति सविस्तर जें कांहीं ब्रम्हांडांत आहे तें ईश्वरानी सांगीतलें आहे. १९

त्यांतहि आदि रहस्यीं अध्याय असेचि सप्त विंशति जो ।
श्री सूर्य वंश कथिला त्या महात्याचें सदांहि अंत रिजो. २०

त्यांतहि आदि १ आणि उत्तर २ अशीं रहस्यें आहेत त्यांतल्या आदि रहस्यांत श्री सूर्य वंश सांगीतलेला जो सत्ताविसावा अध्याय आहे त्याजला जो पाहील त्याचें अंतःकरण सर्व काल रिझो [ त्यांत गुंतून तुष्ट होवो. ] २०

त्रिंगुणिं रजात्मक ब्रम्हा त्याचे मानसज पुत्र बहु असती ।
त्यांतहि आदिच कश्यप त्या पासुन सूर्य आदि उद्भवती. २१

सत्व, रजस्, तमस्, अशा तीन गुणांत रजो गुणजो तें रूप ब्रह्मदेव, त्याचे मनापासून झालेले पुत्र पुष्कल आहेत. त्यांत पहिला कश्यप आहे. त्यापासून सूर्य आदिकरून देव उत्पन्न झाले. २१

**सूर्या पासुनि वैवस्वत मनु त्या पासुनीच इक्ष्वाकु ।**
**बहु वंश चालला त्या तोही बहु योग्य जेंवि इक्ष्वा कु. २२**

सूर्या पासून, वैवस्वत. [ विवस्वान् विवस्वत हीं सूर्याचीं नावें आहेत सूर्या पासून झाला म्हणून बापाच्या नावानुरूप नाव वैवस्वत ] मनु म्हणजे ब्रम्ह देवाच्या एका दिवसांत चवदा होतात त्या चवदा मिळून काळ जो लागतो तो [ चतुर्युग सहस्त्राणि दिनमेकं पितामहः अर्थ. कृत त्रेत द्वापार कलि अशा च्यार युगांचें एक चतुष्क अस्याचतुष्कांची हजार संख्या होते तेव्हां ब्रम्ह देवाच्या एका दिवसाला पुरते ] ह्या एका दिवसांत समकालीं १४ मनु होतात. त्यांतला वैवस्वत मनु सातवा. वर्तमानीं त्याचें मन्वंतर आहे. त्या मनु पासून इक्ष्वाकु झाला आणि पुढें पुष्कळ वंश चालला त्या वंशरूप उसाला उत्पन्न होण्यास इक्ष्वाकुराजा हा चांगली जमीन होय. २२

**त्यांत दिलीप श्रीमान्तत्सुत रघुराज तत्सुताज असे**
**तत्सुत दशरथ त्याचा श्रीराम रमाधवांश पाह कसे २३**

त्या वंशांत श्रीमान् दिलीप राजा झाला. त्याचा पुत्र रघु राजा. त्या रघुचा पुत्र अज राजा. त्या अजाचा पुत्र दशरथ आणि त्या दशरथाचा पुत्र लक्ष्मीपती नारायणचा अंश [ सातवा अवतार ] राम असे झाले. २३

**स्कंद पुराण सह्याद्री खंड आदि रहस्य अध्याय २७**

**महादेव उवाच. अतःपरं प्रवक्ष्यामि माहात्म्य श्रुति संमत ।**
**पाठारीय प्रभूणां वैत्युत्पत्तिं कथयामि ते १**

महादेव बोलतात. यापुढें वेदास मान्य असें माहात्म्य तें, पाठारीय प्रभूंचि उत्पत्ति मी तुला सांगेन. १

**ब्रम्हणो मानसाःपुत्राः कश्यपाद्या मुनीश्वराः**
**कश्यपस्य सुतः श्रीमान् सूर्योभास्वान् जगत्प्रभुः २**

ब्रह्म देवाला मानसापासून कश्यपादि मुनीश्वर पुत्र झाले कश्यपाचा पुत्र सूर्य श्रीमान् आणि प्रभावान् जगताचा प्रभु [ देवादिकांस मान्य ] २

**जगच्चक्षुर्जगद्धाम विश्वसाक्षी सहस्रपात्**
**वैवस्वत मनुस्तस्मात्सूर्यात्समभवत्किल ३**

जगतांची दृष्टी, जगताचें तेज, विश्वाचा साक्षी, सहस्त्र किरण असा झाला त्या सूर्या पासून वैवस्वत मनु उत्पन्न झाला. ३

तस्मिन्कुले समुत्पन्नो दिलीप इति विश्रुतः
मान्यो वदान्यो शूरश्च सत्यवादी जितेंद्रियः ४

त्या कुलांत विश्रुत [ तीनही लोकांत ज्याची कीर्ति आयकुं गेली असा ] मान्य, उदार, शूर, सत्यवादी आणि जितेंद्रिय असा दिलीप उत्पन्न झाला. ४

दिलीपात्तु रघुर्जज्ञे तस्मादज समुद्भवः
अजाद्दशरथो जातस्तत्पुत्रो राम इत्यभूत् ५

दिलीपा पासून रघू झाला त्या पासून अज झाला. अजा पासून दशरथ झाला त्याचा पुत्र राम असे झाले. ५

रामात्कुशः कुशाज्जातोऽतिथिर्नाम भूपतिः
अतिथेर्निषधो जातो नभशब्दस्ततोऽभूत् ६

रामा पासून कुश, कुशा पासून अतिथिनामा पृथ्वीपति झाला, अतिथि पासून निषध झाला, मग नभशब्द झाला. ६

पुंडरीकस्ततो जज्ञे क्षेमधन्वा ततःस्मृतः ।
देवानीकस्ततोऽप्यासीद्वासीनामच तत्सुतः ७

मग पुंडरीक झाला, मग क्षेमधन्वा झाला मग देवानीक झाला त्याचा पुत्र वासी नांवाचा झाला. ७

दलोराजा ततोजातः सीलस्तत्सुत इत्यभूत् ।
उमाभस्तत्सुतोजज्ञे वज्रनाभस्ततः परं ८

मग दलराजा झाला त्याचा पुत्र सील अशा ( नावाचा ) झाला त्याचा पुत्र उमाभ झाला त्या पुढें वज्रनाभ ( झाला. ) ८

खंडनस्तत्सुतोऽप्यासीद्युपितश्च ततःपरं ।
तस्माद्विश्वसमश्चासीद्ब्राह्मण्यो धार्मिकःशुचिः ९

त्याचा पुत्र खंडन त्याच्या पुढें उपीत झाला त्या पासून ब्राह्मण्य ( ब्रह्मरक्षक ) धार्मीक शुद्ध असा विश्वसम झाला ९

हिरण्यनाभ इतिवै तत्सुतः संप्रकीर्तितः ।
कौशल्यस्तत्सुतोजज्ञे तस्मात्सोमसुतःप्रभुः  १०

त्याचा पुत्र सर्वांनी गायिला असा हिरण्यनाभ त्या नंतर कौशल्य झाला त्या पासून सोमसुतराजा झाला. १०

अग्निष्टश्चात्मजस्तस्य पुष्पस्तत्सुत इत्यभूत् ।
तस्मात्सुदर्शनोनामह्यनिवर्णस्ततःस्मृतः  ११

त्याचा पुत्र अग्निष्ट त्याचा पुत्र पुष्प अशा नावाचा झाला त्या पासून सुदर्शन नावाचा मग अनिवर्ण झाला. ११

यस्यवंशे नृपो जज्ञेह्यश्वपातिरितीरितः ।
अपुत्रः सोभवद्राजा पुत्रार्थं यत्नवानभूत्  १२

याच्या पोटीं राजा अश्वपाती असें ज्याला ह्मणतात तो झाला तो राजा अपुत्र झाला ह्मणून पुत्रा करितां यत्न करिता झाला. १२

ऋषीणां संमतिं कृत्वा पुत्रेष्टिं कृतवानिती ।
सर्वस्वं दक्षिणां तत्र ब्राह्मणेभ्यो प्रदत्तवान्  १३

ऋषींची संमती करून पुत्र प्राप्तीचा यज्ञ करिता झाला तेथें ब्राह्मणांस दक्षिणा सर्व द्रव्य देता झाला. १३

नारायणः प्रसन्नोभूद्वाक्यमेतदुवाचह ।
भृगुःप्रसन्नःकर्तव्यो स ते पुत्रं प्रदास्यति १४

अग्निनारायण प्रसन्न झाला आणि असें भाषण बोलला भृगुला प्रसन्न कर तो तुझा पुत्र देयील  १४

भृगुःप्रसादितस्तेन विचार कृतवानिति ।
समीप स्थानृषीन्सर्वान्द्वादशादित्यसंन्निभान्  १५

त्या अश्वपातीनें भृगु प्रसन्न केलेला विचार करिता झाला कीं समीप जे सूर्या सारखे प्रभावान् सगळें बारा अथवा सूर्याचें तेज एकेकांत आहे असे सर्व मुनी (ऋषी) १५

5 At. 13. 8. 91.

उल्लंघ्य यदि दास्यामि तदा कोपो भवेदतः ।
तावद्भिर्मुनिभिस्तावद्दापयामास वै मनून् १६

यांच्या मर्यादा वोलांडून मी जर पुत्र देईन तर त्यांचा कोप होईल तेव्हां जितके ऋषी होते तितके मंत्र देवविले. १६

संख्याकान्द्वादश मंत्रान् दापयामास वै मुनीन् ।
ते मंत्राःऋषिवक्त्रोत्थाःसर्वकामफलप्रदाः १७

बारा संख्या मंत्र ते मुनी देते झाले, ते ऋषींचा मुखां पासून प्रकट झालेले सर्व इच्छित फळ देणारे होते. १७

ऋषयस्तापसान्श्रेष्ठान्तानृषीन्प्रब्रवीमि ते ।
भरद्वाजः पूतिमाक्षो वसिष्ठः कश्यपस्तथा १८

ते ऋषी थोर तापसी त्यांस नावानी वर्णून मी तुला सांगतों. भरद्वाज, पूतिमाक्ष, वसिष्ठ, तसाच किंवा आणि कश्यप. १८

हरितो वृद्धविष्णुश्च तथा ब्रम्हाजनार्दः ।
सौचलः कौटिमश्चैव मांडव्यः कौशिकस्तथा १९

हरित, तसाच वृद्धविष्णु, आणि ब्रह्माजनार्दन, सौबल, कोटिम आणीक मांडव्य कौशिक ही तसाच. १९

विश्वामित्रऋषिश्रेष्ठो द्वादशैते प्रकीर्तिताः ।
मुनिःप्रणीता मंत्रास्ते तेषांर्वदेवताः शृणु. २०

विश्वामित्र महाऋषि, असे बारा ऋषि सांगितले ( स्कंदास महादेवाने ) ते मुनींहीं सांगितलेले मंत्र त्यांच्या देवता ( कोणत्या ) ऐक. २०

प्रभावती कालिकाच चंडिकाच ततःस्मृता ।
महालक्ष्मी इतिप्रोक्ता तथा योगीश्वरीतिच २१

प्रभावती. १ .... कालिका. २ .... चंडिका. ३ .... महालक्ष्मी. ४ .... तसीच योगेश्वरी ५. २१

**इंद्राणीचैव कामाक्षीह्येकवीरांबिकातथा ।**
**माहेश्वरी तथादुर्गा त्वरिताबनुपूर्वशः २२**

इंद्राणी. ६ .... कामाक्षी. ७ .... एकवीरा. ८ .... अंबिका. .... ९ .... माहेश्वरी. १० .... दुर्गा. ११ .... त्वरिता. १२ .... पहिल्या पासून शेवट पर्यंत. २२

## ह्या उपासिल्यामुळें.

**अनुजो देवकश्चैव पृथुर्वै ऋतुपर्णकः ।**
**जयः सुशिभ्रुः सौवामः सुमंतुः कौंडिनस्तथा २३**

अनुज १.... देवक २....पृथु ३.... ऋतुपर्ण ४ ... जय. ५.... सुशिभ्रु .... सौवाम ७ ... सुमंतु ८.... कौंडिन ९....तसाच २३

**मंडूकः कुचिकश्चैव मार्तंडश्चततः स्मृतः**

मंडूक. १०.... कुचिक. ११.... मार्तंड. १२.... असे बारा पुत्र झाले. ह्यांच विस्तार पुढें सांगीतला आहे. त्यांतील तात्पर्य, हा अश्वपाती राजा यास बारा पुत्र झाले मोठ्या आनंदानें राज्य करीत असतां प्रतिष्टान ह्मणजे सांप्रत ज्याला पैठण ह्मणतात त गावांत श्री गोदावरीच्या तटीं तुलादिक अनेक दानें करीत असतां तेथें भृगु ऋषि आ त्यांची आणि अश्वपाती राजाची भेट झाली. राजा दानाच्या गडबडींत राहिल्यामुळें भृ ऋषीचा सत्कार होण्यांत अंतर पडलें त्या वरून भृगूस वाटलें आपण याला हें ऐश्व दिलें असतां त्यांत निमग्न होऊन या दानास जमलेल्या व सर्व ब्राह्मण आदिकरून स जना देखत माझा अपमान करीत आहे हा उन्मत्त झाला असें भृगूस वाटून शापवच बोलले. सह्याद्री खंड पूर्वार्धे अध्याय २८ श्लोक **पूर्वोपकारिणं मां त्वं दुष्ट नस्मरसि प्रभो तस्मात्वं राज्यहीनो वा वंशहीनो भविष्यंसि ७॥** **अर्थ,**—पूर्वी उपकार करणाऱ्या म तूं दुष्ट प्रभु स्मरत नाहींस त्या पासून अथवा तन्निमित्त तूं राज्यहीन अथवा वंशही होसील. हें राजानें ऐकून भृगूस शरण जावून हा प्रकार प्रमादानें ( चुकीनें ) घडल क्षमाकरा. असें बोललेलें ऐकून विचार करून पाहातात तों खरेंच व्यग्रतेमुळें घड असें समजून बोलले. स० आदिरहस्य अध्याय २८ श्लोक. **त्वंचेच्छरण मापन्नोवंश वृद्धिर्भविष्यति ।त्वद्वंशजाश्च राजा नो निःशौर्यो राजहीनतः १३ अद्यप्रभृति तेषांवै ल पिका जीवनंभवेत् । पैठणे पत्तने शप्ता मयाकोपवशात्किल १४ पाठारीयाःप्रसिद्धार**

**पत्तनाख्या भवंतु वः । प्रभूत्तर पदं तेषां पत्तन प्रभवाश्रये १५ अर्थ.**—तूं जर शरणाप्रत पावला ( शरण आला ) आहेस तर वंश वृद्धी होयील तुझे वंशज राजे ते राज्यहीनतेनें शूरत्व रहित असतील १३. आज पासुन त्यांचें जीवन लिहिण्यानें होईल पट्टण शहरांत मी रागाऊन शाप दिला १४. यामुळें पाठारी जे प्रसिद्ध ते तुह्मी पत्तने नांवाचे व्हा. त्या पुढें प्रभू असें पद पट्टणांत उत्पन्नामुळें झालें ( पत्तने प्रभू )...........................

मला वाटतें पत्तने ज्यांजला ह्मणावयाचे ते सूर्यवंशी क्षत्रिय सांप्रत पाताणे प्रभू ह्मणविणारे हे तेच असावे. आणि तेच आहेत तर क्षत्रिय वर्णाचे धर्म ( यजनादितीन कर्मयुक्त ) हे त्यांजलाही आहेत. यामुळें या ग्रंथाचा उपयोग त्यांस ही होयील.

**त्याच रहस्यांत असे त्रिंशत्यध्याय जो तयास पहा ।**
**गणपति प्रश्ना उत्तर देता झाला असे महेश्वर हा २४**

त्याच ( आदि ) रहस्यांत तिसावा अध्याय जो आहे त्याला पहा. गणपतीच्या प्रश्नाला महादेव उत्तर देता झाला आहे. २४

**श्रीसोमवंश क्षत्रियराजे बहु जाहले तयांतुन हो**
**कथितझाले शंकर श्रोत्या तंद्रित कधीं तयां तुं नहो २५**

सोमवंश क्षत्रिय राजे पुष्कळच झाले त्यांची कथा शंकराहीं सांगितली ती येथें सांगतों. हे श्रोत्या या कामास तूं कधीं ही अलसित होऊं नको २५

**ब्रम्हा पासुन कश्यप त्या पासुनि अत्रिहोय ऋषिवर्य ।**
**त्या पासुनि चंद्र तया वंशाला वदति सोम जे आर्य २६**

ब्रह्मदेवा पासून कश्यप, त्या पासून अत्रि ऋषि श्रेष्ठ झाला त्या पासून चंद्र झाला त्या वंशाला जे श्रेष्ठ आहेत ते सोमवंश ह्मणतात. २६

**त्या पासूनि वदान्य वरकर्मा वीरजिद्वरा झाला ।**
**बोधक बुधांस तो हा ह्मणुनी बुध नाम ठेविलें त्याला २७**

त्या पासून उदार श्रेष्ठकर्म करणार वीरजित नावाचा उत्पन्न झाला तो शहाण्यास बोध करणारा झाला ह्मणून त्यांचें बुध असें नांव ठेविलें. २७

तत्सुत पुरूरवा जो त्याचात्रपु आयु त्यात्रपुस वाम।
त्याचे परंपरागत राजर्षी पूर्ण करिति जनकाम २८

त्याचा लेक पुरूरवा त्याचे पुत्र त्रपु, आणि आयु. त्यांतून त्रपुला वामनावाचा पुत्र झाला त्याची पुढें परंपरा चालली हे राजांपं जनाची इच्छा पूर्ण करिते झाले. २८

## स्कंद पुराण सह्याद्री खंड आदि रहस्य अध्याय ३०

शंकरउवाच. श्रृणुवत्स प्रवक्ष्यामि चंद्रवंशस्य विस्तरं ५ यं श्रुत्वा वंशवर्यांहि
विस्मयो जायते नृणां। चंद्रवंशे महावीरा हरिनिषादयो नृपाः ६

शंकर ह्मणतात. हे वत्सा गणपती जो वंश श्रेष्ठ ऐकून लोकांस विस्मय होतो त्या चंद्रवंशांत हरिनयादिकरून महावीर झाले त्या वंशाचा विस्तार मी सांगतों ऐक ६

तं वंशं च वदिष्यामि तवाग्रे च गजानन।
नकस्यापि मयाप्रोक्तं कारणं वंशनिर्णयं. ७

गजानना त्या वंशाला वर्णून तुज पुढें मी सांगतो. कोणालाही ह्या वंशाच्या निर्णयाच्या कारणास मी सांगितलें नाहीं. ७

यदिते श्रवणे बुद्धिर्वक्तुमिच्छामि आदितः।
जज्ञिरे कश्यपोह्याद्यौ तस्मादत्रिरभूत्पुरा. ८

तें श्रवण करण्या विषयीं तुला बुद्धि झाली आहे तर मी आरंभा पासून सांगू इच्छितों प्रथम कश्यप झाला त्या पासून प्रथम अत्रि झाला ८

विद्युत्तेजः समोलोके ततोऽत्रिस्तपसा पुरा।
अत्रिश्चक्षुः समुत्पन्नस्तेजसांपतिरीश्वर : ९

मग तो अत्री तपाच्या योगानें दिसण्यांत विजेसारखा तेजस्वी झाला. अत्रीच्या नेत्रांपासून तेजांचा पती ईश्वर झाला. ९

आल्हादको हि लोकानामौषधीनां च पोषकः।
धात्वर्थस्य बलात्सोपि चंद्रनामेति विश्रुतः १०

तो लोकांचा अल्हादकारक आणि ओषधींचा पोषाक झाला तो धातु अर्थाच्या बळानें चंद्र या नावानी विख्यात झाला. १०

तत्पत्नी रूपसौभाग्या नाम्ना रूपांगना शुभा ।
तस्यां च निर्मितः पुत्रो रूपलावण्यसंयुतः ११

त्याची पत्नी रूप हेंच जीचें सौभाग्य असी रूपवती नावाची तिच्या ठायीं रूप आणि लावण्यासह युक्त असा पुत्र निर्माण केला. ११

वदान्यो वीरजिद्वीरो वरकर्मा वराननः ।
नाम्ना बुध इति ख्यातो बुधानां बोधकारकः १२

तो वीरजित उदार वीर, श्रेष्ठकर्मकर्ता उत्तममुखश्रीवान् बुद्धिवानांस बोध करणारा झाला म्हणून बुध असें त्याचें नाव ख्यात झालें. १२

पुराणेषु च सर्वेषु विश्रुतो वरदो विभुः ।
तत्पुत्रः श्रीमतांश्रेष्टः पुरूरवा महामतिः १३

सकल पुराणांत सर्वांस माहीत वरदाता भग (भाग्य) वान असा वर्णिला आहे त्याचा पुत्र श्रीमतांत श्रेष्ट महामति पुरूरवा झाला. १३

पुरूरवात्त्रपुःपुत्रोऽथनुजो आयुरित्यभूत ।
त्रपुर्वाम इतिख्यातो वामात्कुश समुद्भवः १४

पुरूरव्यापासून पुत्र त्रपु, त्याचा अनुजआयु नावाचा झाला, त्रपु पासून वाम नावाचा झाला, वामा पासून कुश उत्पन्न झाला. १४

कुशाद्भानु समुत्पन्नो भानोः सोमश्च वै नृपः ।
सोमाच्छिरस्तु नामाभूच्छिरसस्तु धनंजयः १५

कुशापासून भानु झाला भानुपासून सोमराजा झाला सोमापासून शिरसनामा झाला तया शिरसापासून धनंजय झाला. १५

धनंजयात्तु मांगल्यः कामराज ततःपरं ।
कामात्तु पंगु नामाभूत्तत्सुतो रविमंडलः १६

धनंजयापासून मांगल्य त्या नंतर कामराज कामापासून पंगुनामा झाला त्याचा पुत्र रविमंडल. १६

तद्वंशे नृपतिर्जातो वीर्यवांश्च सनातनः ।
धर्मिष्टो नीतिदक्षश्च सर्वजितः पराक्रमः १७

त्याच्या वंशांत सनातन बलाढ्य धर्मिष्ट नीतिमध्यें जाणता पराक्रमी सर्वजित नावाचा राजा झाला. १७

**सर्व जितान्मधुर्जातो तत्पुत्रो माघभूपतिः ।**
**माघात्तुत्विंदु भूपालो तत्सुतो दुष्टमर्दनः**

सर्व जितापासून मधु झाला त्याचा पुत्र माघराजा माघापासून इंदु त्याचा पुत्र दुष्ट-मर्दन झाला.

**दुष्टमर्दनसोधर्मो धर्मात्काम इतिश्रुतः ।**
**कामात्तुकौशिकोराजा तत्पुत्रो रविमंडणः १९**

दुष्टमर्दनापासून धर्म धर्मापासून काम नावाचा, कामापासून कौशिक राजा त्या-पासून पुत्र रविमंडण. १९

**तद्वंशे सिमिभूपालस्तत्पुत्रोवागलालनः**
**तद्वंशे वज्रनामाभूत्तत्पुत्रस्त्विंदुमंडनः २०**

त्याच्या वंशांत सिमिराजा त्याचा पुत्र वागलालन, त्याच्या वंशांत वज्रनामा झाला त्याचा पुत्र इंदु मंडन. २०

**तत्सुतः कामपालोभूत्तद्वंशे सलिलःपरं ।**
**सलिलादमधोजज्ञे तत्पुत्रः काशिईश्वरः २१**

त्याचा पुत्र कामपाल झाला त्याच्या वंशांत पुढें सालिल झाला सालिला पासून अम झाला त्याचा पुत्र काशिईश्वर. २१

**तस्य भूषणभूपालः कांतिराजा तु तत्सुतः**
**कांतिराजकुले चैव जातश्च पृथुभूपतिः २२**

त्याचा भूषण राजा त्याचा पुत्र कांतिराजा नंतर कांतिराजाच्या कुलांत पृथुराजा झाला. २२

**तस्यवंशे नृपोजज्ञे कामपातिरितीरितः**
**अपुत्रः सोभवद्राजा पुत्रार्थं यत्नवानभूत्. २३**

त्याच्या वंशांत ज्याला कामपाति ह्मणतात तो राजा झाला तो निपुत्र झाला ह्मणू करितां यत्न करितां झाला. २३

ऋषीणां संमतिं कृत्वा ह्यश्वमेधं चकार सः
पुत्रेष्टिं च ततः कृत्वा सवस्त्रदक्षिणां ददौ. २४

ऋषींशी मिळऊन त्यांचे मत घेऊन तो अश्वमेध करितां झाला मग पुत्र इष्टी केली आणि वस्त्रांसह दक्षिणा दिली. २४

नारायणः प्रसंनोभूद्वाक्यमेतदुवाचह
नारायणः स्वमुखेन मंत्राष्टाक्षर देशिकः २५

नारायण ( अग्नि ) प्रसन्न झाला आणि तो नारायण आपल्या मुखानें असें बोलला तो अष्टाक्षर मंत्र गुरु. २५

तेमंत्राः ऋषिसंयुक्ताः मंत्रबीजस्य देवताः
महाऋषि समस्तस्य मंत्रः श्रुतिसमायुतं २६

तेमंत्र ऋषि सहित मंत्रबीजाची देवता आणि सगळ्या महाऋषीचे वेदा सहीत मंत्र. २६

तेमंत्राः ऋषिवक्रोत्थास्तान्ऋषीन्प्रब्रवीमि ते
पद्माक्षश्च्यवनश्चैव गौतमः कौंडिनस्तथा, २७

ते मंत्र ऋषीच्या मुखापासून निघाले त्या ऋषीच्या नावांस मी तुला सांगतों पद्माक्ष, च्यवन गौतम, तसा कोंडिन. २७

सौनल्पश्चंपकश्चैव वसिष्ठः कस्यपस्तथा
विश्वामित्रो भृगुश्चैव भरद्वाजोत्रिरेवच. २८

सौनल्प, चंपक, वसिष्ट, कश्यप आणि विश्वामित्र, भृगु, भरद्वाज, आत्रि, असे आणि. २८

हिरण्यो हरितश्चैव देवराज ऋषिस्तथा
मृकुंडुरंगिरा गर्गो मांडव्यः शौनकस्तथा. २९

हिरण्य, हरित, देवराज ऋषि, तसाच मृकुंड, अंगिरा, गर्ग, मांडव्य, शौनक. २९

भद्रऋषिः कृपायुश्च शूलकः शीलचामरः
मार्तंडोहि ऋषिश्रेष्ठो विश्वावसु ऋषेश्वरः ३०

भद्र, कृपायु, शूलक, शीलचामर, मार्तंड श्रेष्ठऋषि. विश्वावसू ऋषेश्वर ३०

दाल्भ्यश्चपूतिमापश्च जावाली गणको ऋषिः
वैरुक्षी वेतसश्चैव जमदग्निश्च तापसः ३१
दाल्भ्य, पूतिमाप, जावाली, गणक, वैरुक्षी, वैतस, जमदग्नि असे तप करणारे ऋषि ३१

भावनः सौमनश्चैव ऋषिर्नामाभिदुंदुभिः
द्राविणोगोपकुमरो मैत्रेयश्चैव मंडनः ३२
भावन, सौमन, दुंदुभि, द्राविण गोप कुमार, मैत्रेय, मंडन. ३२

बकदाल्भ्य रोमाणः कुमरो भावनी तथा
मालिवंत ऋषिश्चैवअग्निक्षो ऋषिसत्तमः ३३
बकदाल्भ्य, रोमाण कुमार, भावनी, तसाच मालिवंत, आणि अग्निक्ष, ऋषि श्रेष्ट. ३३

मुद्गलः पारिजातश्च ऋषिर्दामोदरस्तथा
साल्यनश्च ऋषिश्रेष्ठः-पार्थपश्च महाऋषिः ३४
मुद्गल, पारिजात. तसाच दामोदर ऋषी, साल्यन, आणि पार्थप. असे श्रेष्ट महाऋषि ३४

चारणाक्षोग्र ऋषिश्चंबष्ट ऋषि भावनः
सोमकांतो भीमऋषिश्चमकः प्रात इत्यपि. ३५
चारणाक्ष, उग्र, अंबष्ट, भावन, सोमकांत, भीम, चमक, प्रात असे सर्वहं ऋषि. ३५

मुनिप्रणीता मंत्रास्ते तेषांचे देवताः शृणु
योगीश्वरी महालक्ष्मीश्चेकवीरा च कालिका. ३६
मुनीनी सांगीतलेल्या मंत्राच्या देवता ऐक, योगीश्वरी, महालक्ष्मी, एकवीरा, आणि कालिका. ३६

कुमारी चैव कामाक्षीश्चंबिका च सरस्वती
उमा वागीश्वरी चैव ललिता हरिणाक्षिका. ३७
कुमारी, कामाक्षी, अंबिका, सरस्वती, उमा, वागीश्वरी, ललिता, हरिणाक्षी. ३

चंडिका रेणुका चैव महाकाली च तालिका
इंद्राणी वज्रिणी चैव ब्राह्मी पद्मावती तथा. ३८

चंडिका, रेणुका, आणि महाकाली, तालिका, इंद्राणी, वज्रिणी, ब्राह्मी, पद्मावती. ३८

नीलांबा चैव कोलांबाचांबा नागेश्वरी तथा ।
रक्ताक्षी विजयादेवी महादेवी च तामसी. ३९

नीलांबा, कोलांबा, अंबा, नागेश्वरी, रक्ताक्षी, विजया, महादेवी, तामसी. ३९

सुनंदा पूतिमाक्षी च नीलादेवी जलेश्वरी
मातृका मातृनंदा च मालिनी चैवउर्पिका. ४०

सुनंदा, पूतिमाक्षी, नीलादेवी, जलेश्वरी, मातृका, मातृनंदा, मालिनी, उर्पिका. ४०

आरुणाचारुणाक्षी च कुरुला पानमालिनी
चंपावती तथा दुर्गात्वीश्वरी विरहेश्वरी. ४१

अरुणा, अरुणाक्षी, कुरुला, पानमालिनी, चंपावती, दुर्गा, ईश्वरी, विरहेश्वरी. ४१

शार्ङ्गी च पाटलादेवी त्वरिता मालमालिनी
मुंजा माहेश्वरी चित्रा काल्याकापिचअप्सरा. ४२

शार्ङ्गी. पाटला, त्वरिता, मालमालिनी. मुंजा, माहेश्वरी, चित्रा, काल्याका, अप्सरा. ४२

दाडिमी भद्रिकादेवी वैष्णवी च तथोग्रिणी
मोहिनीच सुवर्णाक्षी भैरवीभामिनी तथा. ४३

दाडिमी, भद्रिका, वैष्णवी, उग्रिणी, मोहिनी, सुवर्णाक्षी, भैरवीभामिनी. ४३

जातिका सौमनीदेवी दलिनी दैत्यनाशिनी
प्रभावती च शीलांजा बगिलाभामिनी तथा. ४४

जातिका, सौमनी, दलिनी, दैत्यनाशिनी, प्रभावती, शीलांजा, बगिलाभामिनी, तसी. ४४

अमरा पार्वती चैव शक्ती सोमेश्वरी तथा
महामारी तुलादेवी बालणा पन्नगेश्वरी. ४५

अमरा, पार्वती, शक्ति, सोमेश्वरी, महामारी, तुलादेवी, बालणा, पन्नगेश्वरी. ४५

**त्रिपुरा चैव कामाक्षी चित्रज्वाला विशेश्वरी**
**सर्प्या च विजुलीनाम्नी बालांबाश्चनुपूर्वशः ४६**

त्रिपुरा कामाक्षी चित्रज्वाला विशेश्वरी सर्प्या विजुली बालांबा मागें पुढें 'पात्रेतों [ अशा ] ४६

**इति-स्कंद पुराणे सह्याद्री खंडे आदि रहस्ये व्यास सनत्कुमार संवादे क्षत्रियोत्पत्ति कथनं नाम त्रिंशत्तमो ध्यायः ३०**

असा स्कंद पुराणांत सह्याद्री खंडांत आदि रहस्यांत व्यास आणि सनत्कुमारांच्या संवादांत क्षत्रिय कसे उत्पन्न झाले तें सांगीतलेला तिसावा अध्याय ३० हा वंश पुढें एकतीस ३१ बत्तीस ३२ तेहतीस ३३ चवतीस ३४ अध्यायांत सांगीतला आहे.

**अध्याय चौतिसावा टाका ते साधसप्तति श्लोक**
**गणपति प्रश्न पहा त्या श्रवणें तृप्तीस पावती लोक. २९**

वर लिहिलेल्या ग्रंथाच्या चवतीसाव्या अध्यायांतले साडेसत्तर श्लोक टाका आणि गणपतीचा प्रश्न पहा त्याच्या श्रवणानें लोक तृप्तीस पावतील. २९

**भरताद्यकार्तवीर्या नहुषाद्या या महाबला हितशा**
**श्रीकृष्णप्रिय पांडववीराच्या कीर्ति वर्णिल्या न तशा ३०**

भरत कार्तवीर्य नहुष आदिकरून अशा चांगल्या महान्बलाढ्यांच्या तशाच श्रीकृष्णाचे प्रिय पांडव वीर यांच्या कीर्ति वर्णिल्या नाहींत. ३०

# स्कंद पुराण सह्याद्री खंड आदि रहस्य अध्याय चवतीस. ३४

**गणेश उवाच—देवदेव जगंनाथ भक्तानुग्रह कारक. ७१**

गणपति ह्मणतो हे देवांच्या देवा जगताच्या नाथा भक्तांवर कृपा करणाऱ्या. ७१

**वंशोयं हि त्वया मोक्तो लोकोद्धारण हेतवे**
**सोमवंशे महावीरास्त्रैलोक्याख्याति पौरुषाः ७२**

लोकांचा उद्धार होण्याकरितां हा वंश तूं सांगीतलास ह्या सोमवंशांत त्रैलोक्यांत ज्याचा पुरुषार्थ आणि नांव असे वीर. ७२

भरताद्याः कार्तवीर्या नहुषाद्या महाबलाः
तद्वंशजाश्च शूराश्च पांडवाः कृष्णवल्लभाः ७३

भरत कार्तवीर्य नहुष आदिकरून महाबली आणि त्यांचे वंशज श्रीकृष्ण भक्त शूर पांडव. ७३

त्रैलोक्यस्यापि जेतारः सत्यसंधा धृतव्रताः
येषां कीर्तन मात्रेण चरित श्रवणादपि. ७४

त्रैलोक्यास जिंकणारे खरें बोलण्याचीं व्रतें धरिलेले ज्यांचें चरित ऐकल्यानें त्यांचें कीर्तन केल्यानें ही. ७४

पुण्यमक्षय्यमाप्नोति तेषां वै चरितं त्वया
वंशो मे वा कुतोनोक्तः सर्वज्ञेन महामते. ७५

ज्याला क्षय नाहीं असें पुण्य [ श्रवण कीर्तन करणारा ] पावतो त्याचें चरित अथवा वंश हे महामते [ शंकरा ] तूं सर्व जाणत्यानें मला कोणता तो सांगीतला नाहीं. ७५

महादेव उवाच,—पूरूरवा सोमवंशे तत्पुत्र त्रपु नामकः
विद्वज्जन पोषकश्च ततो वीरोरिमर्दनः ७६

महादेव बोलतो [ किंवा ह्मणतात ] सोमवंशांत पुरूरवा जो त्याचा पुत्र त्रपु नात्राचा विद्वान जनाचें पोषण करणारा तसाच ( किंवा त्यापासून ) वीर शत्रूचें मर्दन करणारा. ७६

त्रपोर्वंशस्य विस्तारो मया ते कथितः किल
अयोर्वंशा महावीर्या महीशाद्याश्च जज्ञिरे. ७७

त्या त्रपुच्या वंशाचा विस्तार मी तुला सांगीतलाच आहे, आयुच्या वंशांत महान् बली महीश आदिकरून झाले. ७७

भरताद्याः पांडवाद्याः कुरवश्च महौजसः
तेषां वंशस्य विस्तारो भारतादौ प्रकीर्तितः ७८

भरत पांडव आदिकरून कुरुचा वंश महा तेजस्वी त्यांच्या वंशाचा विस्तार भारतांत आधींच सांगीतला आहे. तो. ७८

**अत्र वै ते मया प्रोक्त इति जानीहि पुत्रक.**

येथें तुला मीं सांगीतला आहे असें पुत्रा तूं जाण [ समज ]

## अध्याय समाप्त [ चौतिसावा. ]

**वदति महादेव पहा पंचोत्तर सप्तती पुढें दिष्ट**

**आहे तें कथि येथें श्रोत्यांलागूनि हो महाइष्ट. ३१**

महादेव म्हणतात पंचाहत्तर श्लोका पुढें दिसत आहे पहा तें येथें सांगतों ऐकणारांस फार आवडतें होवो. ३१

**सोमक पुरूरव्याचा पुत्र त्रपु त्याचिया सुवंशाला**

**केलें वर्णित येथें विद्वज्जन पोपकारि मथित्याला. ३२**

सोमवंशाचा पुरूरवा जो त्याचा पुत्र त्रपु त्याच्या उत्तम वंशाला विद्वज्जन प्रोपव शत्रूचें मथन कर्त्याला येथें वर्णिलें आहें. ३२

**आय्वाख्य त्रप्वानुज तद्वंशीं वीर जे महीशाद्य**

**भरताद्य पांडवाद्य वर्णियले भारतीं कथा आद्य ३३**

आयु नावांचा त्रपुचा धाकटा भाऊ त्याच्या वंशांत जे महीश भरत पांडव आदिकरू वीर झाले ते भारतांत प्रथम वर्णिले आहेत. ३६ भारत आदिपर्व ! श्री विष्णु पासू ब्रह्मा त्याच्या उजव्या अंगुष्ठा पासून दक्ष प्रजापति झाला. त्याची कन्या अदिति ( ब्र देवाच्या मनापासुन झालेले कश्यप ऋषि त्याची स्त्री ) तीचा पुत्र विवस्वान् [ श्री सूर्य त्याचा पुत्र वैवस्वतमनु त्याची कन्या इला नावाची ती बुधाची ( चंद्राचा पुत्र वीरजित नावा चा मोठा विवेकी बुद्धिमान् चांगल्यानां बोधकर्ता असा झाला म्हणून त्याचें नांव बुध पड त्याची ) स्त्री तिचा पुरूरवा त्याचा आयु त्याचा क्रोष्टा त्याचा पुत्र नहुष त्याचा पुत्र यया त्याची स्त्री देवयानी [ ब्रह्म देवाचा मनापासून झालेला पुत्र भृगु त्याचा वंशज ( श्री शुक्र चार्य त्याची कन्या ) तीचा पुत्र यदु त्याचें वंशज यादव दुसरी स्त्री शर्मिष्ठा [ अदिती दुसरी बहिण दिति तीचे पुत्र दैत्य हेही कश्यप ऋषींचे वंशज अदितीचे पुत्र आदित्य म्ह देव त्या देवांच्या मूळ पुरुषांचे सापत्न आणि मावसभाऊ त्यांत वृषपर्वा नावाचा राजा दै त्याची कन्या ] तीचा पुत्र पुरू त्याचे पौरव त्या वंशांत पांडवादि. झाले. असा विस्त श्रीमन्महाभारत आदि पर्वांत आहे. ययातीचे पुत्र १ ला यदु, २ रा तुर्वसु, ३ रा द्रु

४ था अनु ५ वा पुरु ह्यांत यदु आणि तुर्वसु हे दोघे देवयानीचे आणी द्रुह्यु; अनु आणि पुरु हे तिघे शार्मिष्टेचे ह्यान्या वंशजांचें वर्णन तें महाभारत या शिवाय हेमाद्रि प्रबंध ग्रंथांत आठ ख्रियांचा विस्तार आहे तेही कलियुगांत आहेत.

कलियुगांत ब्राह्मण आणि शूद्र यांहून अन्य वर्णांचा ऱ्हास झाला आहे असें जें ह्मणणें तें व्यर्थ आहे. शूद्र कमलाकर ग्रंथ शके १८०५ साली रावजी श्रीधर गोंधळेकर याणि छापिला आहे त्याचें पत्र ८१ पंक्ती १०।११

ननु कलौ क्षत्रिय वैश्याभाव उक्तो

भागवते नवम स्कंधे. इक्ष्वाकूणामयं वंशः सुमित्रांते भविष्यति ।
ततस्तं प्राप्य राजानः संस्थां प्राप्स्यंति वै कलौ ॥ १ ॥

कलींत क्षत्रिय आणि वैश्य नाहींत असें म्हटलें नाहीं. भागवत नववे स्कंधांत इक्ष्वाकुचा वंश हा सुमित्राचे शेवटीं होयील तेव्हां त्याला मिळून राजे कलींत आपल्या संस्थेस पावतील.

देवापिर्योगमास्थाय कलाप ग्राममाश्रितः ।
सोमवंशं कलौ नष्टं कृतादौ स्थापयिष्यति ॥ २ ॥

देवापी योगांत असून कलाप गांवाचा आश्रयकरून पहिल्यानें कृतांत नष्टराज्य झालेला वंश कलींत स्थापील.

द्वादशेपि एतेषां नाम लिंगानां पुरुषाणां महात्मनां ।
कथामात्रा विशिष्टानां कीर्तिरेवास्थिता भुवि ॥ १ ॥

बाराव्यांतही या माहात्मा विशिष्ट पुरुषांची नावा लिंगांची कथा कीर्ति जसीच्यातसी भूमिच्याठायीं राहीली.

देवापिः शंतनोर्भ्राता मरुश्चेक्ष्वाकु वंशजः ।
कलाप ग्राम आसाते महा योगबलान्वितौ ॥ २ ॥

देवापी शंतनूचा भाऊ आणि इक्ष्वाकु वंशज मरु हे दोघे कलाप नावाच्या गावीं मोठे योगाने युक्त असे.

तावितेत्य कलेरंते वासुदेवानु शिक्षितौ ।
वर्णाश्रम युतं धर्म पूर्ववत्प्रथयिष्यतः ॥ ३ ॥

ते भूमीवर वासुदेवाची आज्ञा धारण करणारे कलीच्या अंतापर्यंत वर्णाश्रम धर्म पूर्वी प्रमाणें वाढवितील.

विष्णु पुराणे. देवापिः पौरवो राजा मरुश्चेक्ष्वाकु वंशजः ।
कृतेयुग इहागत्य क्षत्र प्रावर्तकौ हितौ ॥ १ ॥

विष्णु पुराणांत पुरु कुळीचा देवापी राजा आणि इक्ष्वाकु वंशज मरु इहलोकीं येऊन कृतयुग विषयक प्रवृत्ती करिते होतील.

तथा. महापद्मपतिः कश्चिन्नंदः क्षत्रिय नाशकृत् ।
नंदश्च कलेरादौ परीक्षितोनंतरं जातः
आरभ्य भवतो जन्म यावन्नंदाभिषेचनं ।
एतद्वर्ष सहस्रं तु शतंपंच दशोत्तरं ॥

तसेंच महापद्मपति नंद क्षत्रियाचा नाशकर्ता. नंद कलीच्या आरंभीं परीक्षिती नंतर झाला तुमच्या जन्माला आरंभून नंद राजाच्या अभिषेकपर्यंत वर्षे १.५१०

पुराणांतरेपि. ब्राम्हणाः क्षत्रियो वैश्या शूद्र वर्णास्त्रयो द्विजाः ।
युगेयुगे स्थिताः सर्वे कलावाद्यंत यो स्थिता

पुराणांतरांत ही. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र वर्ण यांत तीन द्विज युगायुगीं होते, कलींत सर्व आद्यपासून अंतपर्यंत असतील.

असें असतां ब्राह्मण आणि शूद्र हे दोन वर्ण मात्र कलींत आहेत इतर वर्ण नाहींत. असें जें ह्मणतात त्यास कारण महाभारतांतील श्लोक असावा. **पंच लक्षण संपंनो ईदृशो यो भवेद्विजः तमहं ब्राम्हण ब्रूयां शेषाः शूद्रा युधिष्ठिर ॥** अर्थ.—पांच लक्षणें ज्याला प्राप्त असतील असा जो द्विज होयील त्याला मी ब्राह्मण बोलेन हे युधिष्ठिरा बाकी सर्व शूद्र. यावरून दोनच वर्ण आहेत असे ह्मणतात. पण यांत ब्राह्मण कुळांत उत्पन्न झाला असुन ही जर पांच लक्षणें त्याला नाहींत तर तो शूद्रच आहे असा जो अर्थ निघतो त्याकडे कोणी पाहात नाहीं.

**रवि सोम वंश दोन्ही भार्गव रामा अधींच कीं होते**
**श्रीकृष्ण आठवा जो अवतार तया पुढेंहि जे होते ३४**

अहो सूर्य आणि चंद्र ( सोम ) वंश दोन्ही ही ते भार्गवरामा आधीच झालेले कीं परशुराम [ भृगु कुलांतील ह्मणून भार्गव ] अवतारापुढें एक टाकून दुसरा ह्मणजे आठवा अवतार श्रीकृष्ण त्याच्या नंतरही होते तेच तेवंश. ३४

**अन्येतिहास आहे कथिला श्री शंकरें गणेशाला**
**एकोन तिसाध्यायीं पाहा सह्याद्रि खंडिं जो त्याला. ३५**

सह्याद्रि खंडात एकोनतिसाव्या अध्यायांत श्री शंकरानें गणपतीला सांगीतलेला दुसरा जो इतिहास आहे त्याला पहा. ३५

**निः क्षत्रिय पृथ्वी जैं केलीसे भार्गवें अनंतर हो**
**क्षत्रिय वंश कसातो आहे गणपति पुसे तदंतर हो. ३६**

अहो भार्गवानें जेव्हां निःक्षत्रिय पृथ्वी केली तेव्हां नंतर तो क्षत्रिय वंश वर्तमान जो आहे तो कसा होता झाला ह्याचें अंतर ( गुह्य ) काय आहें तें गणपाति विचारता झालां. ३६

**राम महेंद्र गिरीला गेला तप आचरूं तया आधीं**
**त्रिःसप्त वेळ केली तेणें निःक्षत्रिया धरा साधीं. ३७**

राम महेंद्र ( दक्षिण समुद्र किनाऱ्याच्या ) पर्वतावर तप करण्याला गेला त्या पूर्वी त्या सदुःखानें ( आपला बाप जमदग्नि ह्याला कार्तवीर्यार्जुन क्षत्रिय यांणें दुःक्षत्रिय धर्मानें मारिलें हें दुःख ज्याच्या मनांत होतें त्या ) परशुरामानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली. ३७

**तेव्हां निपुत्रकांच्या भार्या ज्या वंश वृद्धि करिवां त्या**
**शंशितव्रत जे ब्राह्मण आराधुनि तुष्ट करिति त्यां झाल्या. ३८**

तेव्हां निपुत्रिकांच्या भार्या ( पति आणि त्यांचे पूर्वजांस गती देणारी जी पुत्रादि संतती तीचा भार वाहणें जीणे आपल्याकडेस घेतलें आहे असी विवाहित स्त्री ) ज्या शाहण्या होत्या, त्या वंशवृद्धी करितां जे शंसितव्रत ( व्रतें धारण करून व्रतस्थ असल्यामुळें ज्यांच्या व्रताची प्रशंसा लोक करितात असे ब्रह्मनिष्ठ ) ब्राह्मण त्यांस आराधून ( पूजून स्तुती करून ) तुष्ट करित्या झाल्या. ३८

**त्या ऋषिवर्यां पासुनि झाले जे क्षत्रवीर संमत गा**
**तैशाच कन्यकाही झाल्या तद्वृत्त सर्व संमत गा. ३९**

त्या ऋषि श्रेष्ठां पासून जे क्षत्रिय झाले ते वीरांला मान्य तशाच कन्याही झाल्या त्यां-चें वृत्त लोकांस मान्य आहें तें गा हो. ३९

**निःक्षत्रिय पृथ्वी जैं होती तैं खिन्न सर्वजन होते**
**सक्षत्रिय ती होतां सर्वचि हर्षास पावले हो ते. ४०**

पृथ्वी जेव्हां निःक्षत्रिय होती तेव्हां सकल जन [ ब्राह्मणादि सर्व वर्णांचे मनुष्य ] खेदयुक्त होते ते पुनः सक्षत्रिय [ राज्यशासन प्रजापालन आणि यज्ञादि कर्मे क्षत्रिय करूं लागलें असी ] पृथ्वी होतां सारेच हर्षास पावले. ४०

**प्राचिन निदेश धर्मा आचरतां पुण्य पावना सारा**
**ब्रम्हज्ञ कृपा झाली दुःसंदेहास मागुता सारा. ४१**

प्राचीन ( वेदाज्ञेनें चाललेला ) निदेश धर्म ( पती करितां संतती करण्याची पतीची आज्ञा आहेच ) पुण्य [ उत्तम ] पावन ( सुगती देणारा अथवा परम शुद्ध ) सार ( गृहण करण्यास योग्य ) असा आचरतां ब्रह्मवेत्ते जे ऋषि त्यांची कृपा झाली [ संतती उत्पन्न के-ली ] दुःसंदेह ( वाईट संशय ज्यांत जारकर्म दोषाची कल्पना करणें असा ) जो त्याला मागें सारा [ पुढें घेऊं नका हा भाव ] ४१

**बहुयज्ञ क्षत्रियाहीं केले बहु दक्षिणें ऋषींनी ही**
**सांगोपनिषद्वेदीं याजियलें तद्गणेश जानीही. ४२**

त्या क्षत्रियांही पुष्कळ यज्ञ केले ते वेद वेदांगें उपनिषदें यांचे मंत्रांनीं दान घेण्यास पात्र ( पत नात्रायते इति पात्रं ह्मणजे अधोगतीस जाण्याच्या दोषापासून जो तारितो तो पात्र ) अशा ऋषींनी चालवून ज्यांजपासून दक्षिणा घेतली असतां पातक लागत नाहीं तसे ते समजून दक्षिणा घेतल्या. महादेव ह्मणतात हे गणपते तुझ्या प्रश्नाचें उत्तर असें आहें तें समज. ४२

## स्कंद पुराण सह्याद्री खंड आदि रहस्य अध्याय २९.

**गणेश उवाच,—शिव शंभो महादेव भक्तानुग्रह कारक ।**
**पूर्वं श्रुतं मया तात भार्गवेण कृतं पुरा. १**

गणेश म्हणतो. अहो महादेवा भक्तकृपाकरा बापा भार्गवानें पूर्वी केलें तें मी पूर्वी ऐकिलें की. १

**कृता निःक्षत्रिया पृथ्वी कथं तेषां पुनर्जनिः ।**
**एवं मे संशयं नाथ छेत्तुमर्हस्यशेषतः २**

निःक्षत्रिय पृथ्वी केली त्यांची संतति पुनः कसी झाली हा मला संशय आहे. हे नाथा या संशयाचा समूळ छेद करण्यास तूं योग्य आहेस. २

**महादेव उवाच.—रहस्यं खल्विदं तात देवानामपि दुष्करं ।**
**तथेहं कीर्तयिष्यामि नमस्कृत्य स्वयंभुवे. ३**

महादेव म्हणतात.—हे बापा हें रहस्य (सांगणें ऐकणें) खरोखर देवांनाही दुष्कर आहे तें आपणच उत्पन्न झालेला (ब्रह्मदेव) त्यास किंवा स्वयंसृष्ट जो ईश्वर त्यास नमस्कार करून मी तुला सांगतों. ३

**त्रिःसप्तकृत्वा पृथ्वी कृतानिःक्षत्रिया पुरा ।**
**जामदग्न्यस्तपस्तेपे महेंद्रे पर्वतोत्तमे. ४**

तीन सप्तकें करून (एकवीस वेळ) जमदग्नीच्या लेकानें पूर्वी निःक्षत्रिया पृथ्वी केली आणि महेंद्र पर्वतावर जाऊन तप करिता झाला. ४

**तदा निःक्षत्रिये लोके भार्गवेण कृते सति ।**
**ब्राह्मणाः क्षत्रियास्तात गर्भार्थिन्योभिचक्रमुः ५**

भार्गवानें निःक्षत्रिय पृथ्वी केली त्यावेळीं हे बापा गणपते गर्भार्थिनी क्षत्रिणी स्त्रिया ब्राह्मणांस "अभिचक्रमुः" म्हणजे शोधित्या झाल्या. ५

**ताभिःसह समापेतु ब्राह्मणा शंसितव्रताः ।**
**ऋतावृतौ नरव्याघ्रनां कामान्नां नानृतौ तथा. ६**

शंसित व्रत (ज्यांच्या व्रताची स्तुती लोक करितात) असे ब्राह्मण क्षत्रिणी स्त्रिया ज्या त्यांसीं ऋतुऋतुच्या ठायीं "समापेतु" संगत होते झाले. ऋतु नसतां किंवा मनास आल्या वेळेस कामानें संगत झाले नाहींत. ६

**तेभ्यस्तु लेभिरे गर्भान्क्षत्रिण्यस्ताः सहस्रशः ।**
**ततः सुषुविरे तात क्षत्रियान्वीरसंमतान्. ७**

त्यांपासून क्षत्रिणी स्त्रिया गर्भ लाभत्या झाल्या हे तात नंतर वीरांला संमत असे क्षत्रिय सहस्रशः (हजारो) प्रसवल्या. ७

**कुमारांश्च कुमारींश्च पुनः क्षत्राभिवृद्धये ।**
**एवं तद्ब्रह्मणः क्षत्रं क्षत्रिण्यस्तु तपस्विभिः ८**

कुमारांक्षत्रियांस आणि कुमारींस क्षत्रियकुल वृद्धि होण्या करितां प्रसवल्या या प्रमाणें तपस्वी आणि क्षत्रिणी स्त्रिया यांच्या योगानें उत्पत्ती झाली. ८

**जातं वृद्धंच धर्मेण सुदीर्घेण समन्वितं ।**
**चत्वारोपितदा वर्णाः बभूवुर्ब्राह्मणोत्तराः ९**

सुदीर्घ (फारकाल वेद शास्त्र प्रतिपाद्य चालत आलेला) वृद्ध (वाढलेला) त्या धर्मानें युक्त क्षत्रियकुल वृद्धीला पावलें त्या वेळेस चारीही वर्ण ब्राम्हणोत्तर होते झाले. ९

**अभ्यगच्छनृतौ नारी नकामान्नानृतौ तथा**
**तथैव ज्ञान भूतानि तिर्यग्योनि गतानि च १०**

ते ऋतु कालींच स्त्री गमन करिते झाले. ऋतुनसतां व्यर्थ अथवा मनास येईल तसे गमन करीत नव्हते, तसेच ज्ञान झालेले व तिर्यग् योनींतील जीव. १०

**ऋतौ दारेषु गच्छंति तदा वै चतुरानन**
**ततो वर्धत धर्मेण सहस्र शत जीविनः ११**

हे चतुरानना [ गणपते ] ते ऋतुच्या वेळींच स्त्रीगमन करितात तेव्हां मग सहस्र शतावधि जीवी धर्मानें वाढले. ११

**ताः प्रजास्तु विरागाश्च धर्मकृत्य परायणाः ।**
**आधिभिर्व्याधिभिश्चैव विमुक्ताः सर्वतो नराः १२**

त्या प्रजा विरागी, धर्मकृत्य परायण सर्व प्रकारांनीं आधि व्याधि निर्मुक्त झाल्या. १२

**अथेमां सागरोपेतां गो पुत्रक तयो खिलां ।**
**अधि तुष्टतु नः क्षत्रं सशैल वन काननम्. १३**

नंतर क्षत्रिय कुल "गोपुत्रक" (गाय वासरू) न्यायानें डोंगर मोठें गहन कानन (भयंकरं आननं यस्य तत्काननं) वनासहीत सागरा पावेतों पृथ्वीवर अधिकारी झालें.

**प्र शासित पुनः क्षत्रं धर्मेणेमां वसुंधरां ।**
**ब्राह्मणाद्यास्तदावर्णा लेभिरे मुदमुत्तमं. १४**

पुनः क्षत्रिय कुल धर्मानें शिक्षितें झालें तेणेंकरून ब्राह्मणादि वर्ण अतिउत्तम हर्षास पावले. १४

**काम क्रोधोद्भवान्दोपाभिरस्य च जनाधिपाः ।**
**दंडं दंडचेषु धर्मेषु प्रयतं तोप्यपालयन्. १५**

काम क्रोधानें उद्भवलेले दोष टाकून राजे धर्मयुक्त दंड करणें योग्य त्यासच दंड करणें असें योग्य पालन करिते झाले. १५

**अथ धर्मपरे क्षेत्रे सहस्राक्षः शतक्रतुः ।**
**तत्र देशेच काष्टेच वर्षेणाप्याययत्तदा. १६**

नंतर धर्मपर क्षेत्रांतील देशांत दिशांदिशांत शतक्रतु सहस्रनेत्र वृष्टीनें पूर्ण करिता झाला. तेव्हां. १६

**न बालो म्रियते तस्यास्तदा कश्चिद्गजानन ।**
**नच स्त्रियं प्रव्रजति कश्चिदमाप्त यौवनां. १७**

हे गजानना त्या भूमीवर कोणीही अल्पवयी मरत नाहीं आणि ऋतु वाचून ( तरुण झाल्यावाचून ) कोणी स्त्रीगमन करीत नाहींत. १७

**नमायुर्भवतीभिश्च प्रजाभिश्च गजानन ।**
**एवं सागर पर्यंता समापूर्यत मेदिनी. १८**

"न मायुर्भवतीभिश्च" अनमायुः [ अल्पगर्भा ह्मणजे गर्भपात न होणाऱ्या ] प्रजा ज्या त्यांही सागर पर्यंत पृथ्वी गजानना पूर्ण होती झाली. १८

**इजिरेच महायज्ञैः क्षत्रिया बहु दक्षिणैः ।**
**सांगोपनिषदान्वेदान्विर्मांश्चाधीयते तदा. १९**

क्षत्रिय बहु दक्षिणा यज्ञानें ईश्वरांचें यजन करितात आणि वैदीक ब्राह्मण अंग उपनिषदां सहीत तेथें वेदाध्ययन करितात. १९

**नच विक्रियते ब्रह्म ब्राह्मणैश्च तदाकिल ।**
**नच शूद्रसमभ्यासे वेदानुचारयेद्द्विजाः २०**

ब्राह्मणांनी ब्रह्म [ वेद ] विक्रय केला नाहीं हें निश्चायक आहें. तसेंच द्विज शू-द्रां समवेत वेदाभ्यास आणि उच्चार करीत न होते.

**कारयंत कृषी गोभिस्तदा स्यात्क्षीरगा धुरि.**

बैल वाहून ब्राह्मण शेती करीतच होते तेव्हां ही पृथ्वी [ धुरी ] क्षीरगा [ पुष्कळ पिकणारी ] असे.

हें [ स्कंद पुराण सह्याद्री खंड आदिरहस्य एकोनतिस अध्यायांतील कथानक ] एथें दाखविण्याचा हेतु. परशुरामानें पृथ्वी निःक्षत्रिय केली ह्मणून क्षत्रिय राहिलेच नाहींत असें दुरपवादी लोकाचें ह्मणणें असतें यास्तव असें पाहण्याचें कीं,—परशुराम त्रेतायुगांत झाला. ईश्वरानें दहा अवतार घेतले [ असे सर्व लोक ह्मणतात ] त्यांतून हा साहावा आहे. कृत-युगापासून सूर्य आणि सोम [ चंद्र ] वंशाचे असे क्षत्रिय आहेत. आणि परशुरामानें निः-क्षत्रिया पृथ्वी केल्यावर पुनः वंश वृद्धि ही झाली ते ही क्षत्रिय आहेत. आणि सूर्य वंशांत श्रीराम सातवा अवतार आणि सोमवंशांत श्रीकृष्ण आठवा अवतार होऊन हे सर्व वंश पृथ्वीभर कलियुगांत वर्तमान आहेत. तेव्हां परशुरामानें निःक्षत्रिय पृथ्वी केली असें जें ह्मणणें तें गुढार्थाचें आहे असें समजावें इतका आहे. आतां परशुरामानें पृथ्वी निःक्षत्रिय केली असें जें ह्मणणें तें खरें नव्हे. हा मिथ्या वाद आहे असें ह्मणावें तर मिथ्या नाहीं. परंतु अन्यथा [ दुसऱ्या अर्थाचा ] आहे. तो कसा आणि कां ह्याचें स्पष्टीकरण पुढें होईल.

**जरिं एक वेळ झाली असती निः क्षत्रिया धरा सारी ।**
**तरिं दुसऱ्या वेळेला कां मानी परशुराम हे सारी. ४३**

एक वेळ जर सारी पृथ्वी क्षत्रिय रहित झाली असती तर दुसऱ्या वेळेस ही पृथ्वी आपल्या शत्रूंसह आहे असें परशुराम कां मानिता. जर पुनः तेच वंश वाढले आहेत तर नाहींत असे झाले नाहींच. एक वेळ निःक्षत्रिय पृथ्वी झाली असून दुसरे वेळेस सक्षत्रिय आहे, असें आहे तर एकवीसावे वेळे पुढें बाविसावे वेळेस क्षत्रिय कां असूं नयेत? ४३

**ह्या बलिया संदेहा छेदाया पाहवीं उदाहरणें ।**
**दुष्ट क्षत्रिय दृप्त क्षत्रिय मर्दन करीत राम रणें. ४४**

हा मोठां बळकट संदेह उत्पन्न झाला ह्याचा नाश करण्याकरितां उदाहरणें आहेत. परशुराम जो तो "दुष्ट क्षत्रिय" [ वाईट दुःखद आचरण करणारा क्षत्रिय ] "दृप्त क्षत्रिय" [ दर्पानें भरलेला क्षत्रिय ] यांचें मर्दन युद्धानें करितो. ४४

**रामो दुष्टासुरहंता ऐशा या विशेषणा स्कंदीं ।**
**माहात्मि रेणुकाच्या चाळिस सत्ताविसाविया छंदीं. ४५**

राम दुष्ट असुरांस मारणारा असें त्याचें विशेषण स्कंद पुराणांत रेणुका महात्म्यांत चाळीसाव्या अध्यायांत सत्ताविसाव्या श्लोकांत आहे. त्यास पहा, ४५ हा श्लोक २७ छापिलेल्या प्रतींत आहे. दुसरी प्रत द्रविड ब्राह्मणापाशीं मिळाली ती प्रमाणें मी प्रत केली आहे तींत हाच श्लोक अध्याय ४१ यांत ३९ सावा आहे.

## स्कंद पु. रेणूका मा. अध्याय ४०

**शस्त्राणि तस्याप्रतिमानि तानि दिव्यास्त्रयुक्तानि सहस्रबाहोः**
**गणेशरूपैर्विविधैःकुठारैश्चिच्छेद रामोसुर दुष्ट हंता. २७**

सहस्र बाहू ( कार्तवीर्यार्जुन ) याचीं दिव्य अस्त्रांनीं [ वेदमंत्र प्रयोगानीं ] युक्त अप्रतिम शस्त्रें गणेशरूपांनी बहुविध [ अनेक प्रकारचे ] कुठार [ परशु ] यानीं "दुष्ट असुरांचा मारणारा" राम तोडिता झाला. २७

**श्रीमदध्यात्म रामायणीं प्रथम कांडिं सातव्या सर्गीं**
**अष्टम श्लोकीं दृप्तक्षत्रिय मर्दन कथी हर स्वर्गीं. ४६**

श्रीमदध्यात्मरामायणांत बाल कांडांत सातव्या सर्गांत [ अध्यायांत ] आठव्या श्लोकांत शंकर स्वर्गीं [ कैलासीं ] असतां सांगतो राम "दृप्त क्षत्रिय मर्दन" आहे त्याला. ४६

## श्रीमदध्यात्म रा. बालकांड अध्याय. ७

**कार्तवीर्यांतकं रामंदृप्तक्षत्रिय मर्दनं**
**प्राप्तं दशरथस्याग्रे कालमृत्युरिवापरं ८**

कार्तवीर्यांतक रामाला "दृप्त क्षत्रिय मर्दनाला" दुसरा काळ, मृत्यु किंवा काळाचा मृत्यु [ शंकर तमोगुणी ] च दशरथाच्या पुढें प्राप्त झालेल्याला पाहिलें. ८

**कैलासा स्वर्ग असें नाम दिलेंसेचि यमक साधाया**
**अर्थानुरोध नपवो श्रुति अन्य उपाय कोणता धाया ४७**

कैलासास मी [ ग्रंथकर्त्यानें ] स्वर्ग असें नांव दिलें आहें [ हें अमरसिंह कृत अमर कोशांत नाहीं ] हें यमक साधण्या करितांच दिलें आहें. [ असें केल्यावाचून ] अर्थाला विरुद्ध न होतां श्रोत्यांचे कान तृप्त होण्यांस उपाय कोणता. ४७

**सत्क्षत्रिय हि सदासुर वधिले नसती कदांहि देवानें**
**सद्भक्त सदाचरणीं त्यांतें भगवान्पदास दे वा नें. ४८**

चांगले [ साधु ] क्षत्रिय आणि साधु ( चांगले ) असुर देवानें कधींही मारिले नाहींत. सद्भक्त तसेच सदाचरणी यांस भगवान् चांगलें आपलें पद देतो अथवा आपल्या पदास नेतो. ( मुक्ति देतो ) कश्यप स्त्री दिती. तीचे पुत्र दैत्य. दनुचे पुत्र दांनव. हिरण्यकशिपूस मारून मुक्ति दिली. त्याचा पणतू बळी त्यास अक्षय्य राज्य दिलें. माल्यवान् असुराचे दौहित्र. कश्यप ऋषीचे प्रपौत्र रावण, बिभीषण राक्षस त्यांत एकास मारून मुक्ति दुसऱ्या [ बिभीषणास ] अचल राज्य आणि चिर जीवित्व दिलें. सूर्यवंशी क्षत्रिय उतानपाद त्याचा पुत्र औतानपादी [ ध्रुव ] यास अचल स्थान देऊन स्वर्गवासी ध्रुव केला. भीष्माचार्य सोमवंशी क्षत्रिय यास सायुज्य मुक्ती. विश्वामित्र याज्ञवल्क्यादिकांस ब्रह्मर्षित्व दिलें. असीं अनेक भगवत्कृत्यें आहेत. ४८

**श्री भगवानुक्त असे भगवद्गीतेंत वेद अध्यायीं**
**गिरि वसु छंद विलोकी श्रोत्या चित्तीं धरूनि गा ध्यायीं. ४९**

श्री भगवंताचें बोलणें भगवद्गीतेंत चवथे अध्यायांत सातव्या आणि आठव्या श्लोकांत पहा आणि श्रोत्या तें मनांत धरून त्याचा निजध्यास ठेव. ४९

## श्रीमद्भगवद्गीता अध्याय. ४

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहं ७**

हे भारता [ अर्जुना ] जेव्हां जेव्हां धर्माची ग्लानी होते अधर्माचा उत्कर्ष होतो तेव्हां मी आपल्यास रचितों [ मूर्ति देऊन अवतार घेतों ] ७

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृतां
धर्म संस्थापनार्थाय संभवामि युगेयुगे. ८

साधूंचें रक्षण करणें आणि दुष्टांचा नाश करण्यास आणि धर्माची स्थापना करण्यास युगायुगांत श्री उत्पन्न होतों असें शड्गुणऐश्वर्य भगवान् बोलतो. ८

सत्क्षत्रिय राजां विण पृथ्वी रिक्ता च राहिली नसती
रवि सोम वंश दोन्ही घोर कलयुगागमीं हि ते वसती. १०

चांगले [ साधू ] क्षत्रिय राजांनीं रहित झालेली पृथ्वी त्यांवाचून कधींच राहती ना [ कारण पृथ्वीस उपद्रव कारक लोकां करितां " धनुष्य धारण " आणि साधुवृत्ति " प्रजानां परिपालनं " हे क्षात्र धर्म मुख्य आहेत. जर क्षत्रिय नाहींत तर चांगल्याचें पालन आणि खलांस दंडन हीं कर्मे राहिल्यानें पृथ्वी लयास जाती ] आणि वरतें जे सूर्य आणि सोम वंश सांगितले हे घोर कलियुग प्राप्त होई पर्यंत ही आहेत [ तस्मात्क्षत्रिय होतेच ] १०

## श्रीमदध्यात्म रामायण बा. प्रथ. नारद उ.

प्राप्ते कलयुगे घोरे नराः पुण्य विवर्जिताः
क्षत्रियाश्च तथा वैश्याः स्वधर्म त्यागशीलिनाः

श्री नारद ब्रह्मदेवास पुसतात. घोर कल्युग प्राप्त झाल्यांत नर पुण्य विवर्जित, क्षात्रिय, तसेच वैश्य आपल्या धर्माचा त्याग करिते होतील [ नर या शद्बांत ब्राह्मण प्रथम वर्ण याचा समावेश होतो ]

## अयोध्या कांड अध्याय. ५

वामदेव उवाच,
दुष्ट क्षात्रिय भू भार निवृत्यै भार्गवोऽभवत्

वामदेव सांगतात, दुष्ट क्षत्रियांचा भूमीला भार झाला तो उतरण्या करितां भार्गव झाला.

## युद्ध कांड अध्याय. १०

मंदोदर्युवाच.--राक्षसा क्षत्रियाकाराः जाताभूमेर्भरावहाः
तान्हत्वा बहुशो दैत्यान्भुवं जित्वा ददौ मुनेः

राक्षस क्षत्रियांच्या आकारानें भूमीला भारावह झाले त्या पुष्कळ दैत्यांस मारून पृथ्वी जिंकून परशुरामानें मुनिजनांस दिली.

ह्या तीन आधारांस ग्रंथ कर्त्याच्या वडील बंधूंनी शोधून काढून त्यांजवर त्यांच्या चिरंजिवा कडून तीन आर्याछंद लिहिले आहेत ते ह्या लेखनाच्या वेळेस येथें नाहींत. ह्मणून घेतले नाहींत.

**ब्रम्हया पासुनि कश्यप त्या पासुनि जाहलेचि कीं राजे**
**हे न ब्राम्हण्य कसे ब्राम्हण क्षत्रांत कां कली माजे. ९१**

ब्रम्हया पासून कश्यप ऋषी, त्या पासूनच कीं राजे झाले आहेत. ते ब्राह्मण्य ह्मणजे ब्रम्हकर्म करणार व करविणार नाहींत. हें ह्मणणें कसें, ब्राह्मणांत आणि क्षत्रियांत तंटा कां माजतो ? ९१

**एका पासुनि दोघे त्यां माजी न्यून अधिक काय असे**
**तरिं सौम्यकर्म ब्राह्मण कर्मे क्रूरत्व क्षत्रियांत वसे ९२**

एका पासून दोघे झाले त्यांत उणें अधीक काय आहे. असें पाहिलें तर सौम्य कर्मी ब्राह्मण आणि क्षत्रियांत क्रूरकर्म राहतें. ९२

**वेदोक्त कर्म जें ज्या तो त्याचा धर्म बोलती शास्त्रें**
**तो क्षात्रधर्म झाला ज्या कर्मी धारणाचि शस्त्रास्त्रें. ९३**

वेदोक्त कर्म ज्यास जें तो त्याचा धर्म असें शास्त्रें ह्मणतात. ज्या कर्मी -शस्त्र अस्त्रें हीच धारणा आहे तो क्षत्रियांचा धर्म झाला [ हा क्रूर नीचत्व देणारा तरीं अत्याज्य ह्मणजे टाकणें योग्य नाहीं असा ] आहे. ९३

**रूप गुण वसे शस्त्रीं अस्त्रीं सन्यास बीज मंत्र वसे**
**त्या वदति वेद चवथा अथर्वण ह्मणाचि मूर्तिमंत असे. ९४**

रूप [ शस्त्राचा आकार, तरवार, पट्टा, सईफ, खांडा, धोप, [ सडक ] गुर्दा, निमच्या, तेगा, सुरई, सकेला, भाला, बलम, नेजा, विटा, सांग, सैती, आदिकरून आणि गुण हे शस्त्रांत वसतात. अस्त्रांत न्यास बीज सहीत मंत्र वसतो त्याला मंत्र शास्त्र अथर्वण वेद ह्मणावा [ मंत्र शास्त्र प्रवीणास ] तो मूर्तिमंत आहे. गुण, वेद, वर्ण, देव तीन तीनच आहेत तीहींतील कांहीं भेद चवथा होतो. ९४

**तस्मांत्प्रधान कर्म त्या कर्में धर्म पावतो नामा**
**त्या धर्माचा द्वेषचि हें करणें ईश्वरीं नये कामा. ९५**

याचा विचार करून पाहिलें असतां कर्म प्रधान [ मुख्य ] आहे. कर्मानें धर्म अमुक [ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आदि. ] आहे असा ओळखितां येतो तेव्हां नाम पावतो. [ असा ईश्वर शिक्षित ] त्या धर्माचा द्वेष करणें हें ईश्वरा जवळ कामास येत नाहीं. ९५

**ऐशा उदात्दृतीनें होते क्षत्रिय अहेत असतील**
**निःक्षत्रिया कु शब्द नव्हते सार्थक नव्हेत नसतील. ९६**

अशा उदाहरणा [ सार, असार, विचारा ] नी क्षत्रिय भूत काळीं होते वर्तमान काळीं आहेत. भविष्य [ पुढें येणारे ] काळांत असतील. निःक्षत्रिया कु [ पृथ्वी ] हें शब्द सार्थक [ जो अर्थ करितात त्या अर्थासच करणारे ] नव्हते. नव्हेत आणि नसतील. ९६

**हा मुख्य वाद तुटला आतां अन्येतिहास परिसावा**
**श्री परशुराम प्रभुचा झाला अवतार तो असे सावा. ९७**

हा मुख्य [ सर्वांहून पहिला ] वाद तुटला [ क्षत्रिय नव्हते आणि नाहींत असें नाहीं. होते आणि आहेत असा निर्णय झाला ] आतां दुसरा इतिहास [ झालेली गोष्ट वंश कथा ] ऐंका श्री परशुराम हा विष्णुचा अवतार [ दहांतील ] सहावा आहे. ९७

**श्री रेणुका महात्मीं स्कांदीं अध्याय, सा तया माजी**
**पुण्य कथा कथिली जी स्तुत्य असे ती वदे गिरा माजी. ९८**

श्री स्कंद पुराणांत रेणुका माहात्म्यांत सहावा अध्याय आहे त्यांत उत्तम कथा स्तुत्य [ साधूंनी स्तविली ] ती सांगीतली आहे, तीच माझी वाणी बोलते. ९८

**विख्यात पृथ्वीपति राजा इक्ष्वाकु नाम ज्या होतें**
**तद्वंश कथन तेथें कथिलेसें येथ सोडिलें हो तें. ९९**

पृथ्वीपती विख्यात [ सर्व राजे ज्यास राजा म्हणत होते ] असा इक्ष्वाकु नावाचा राजा होता त्याची वंशकथा तेथें [ सहाव्या अध्यायांत ] सांगीतली आहे म्हणून ती येथें सविस्तर घेतली नाहीं. ९९

**त्या वंशांत कुशांब नामा राजा करी तपाला हो**
**मत्पुत्र असें याची त्या करितां इंद्र पुत्र झाला हो.   ६०**

त्या वंशांत कुशांब [ कुशिक, विश्वामित्राचा आजा ] नावाचा राजा तप करून माझा पुत्र हो असें इंद्रास मागता झाला त्या करितां इंद्र त्याचा पुत्र झाला.   ६०

**कौशांब नाम तातान्वयसार चि होय त्याच गाधीला**
**जी नाम पौरुकुत्सा स्त्री होय तया न दे कदांचीला.   ६१**

तयाचें नांव गाधी बापाच्या नांवाच्या शद्बाच्या अन्वयार्थानें कौशांब हें ही नांव झालें. आणि जिचें नांव पौरुकुत्सा होतें ती त्याची स्त्री झाली ती सती पतीला कधींही दुःख देत नवती.   ६१

**त्या राज्ञि पौरुकुत्से उदरीं सत्यवति कन्यका आली**
**ती ऋचिक भार्गवा दे तात म्हणुनि ती ऋषिप्रिया झाली.   ६२**

पौरुकुत्सा राणीच्या पोटीं सत्यवती नावाची कन्या आली. तीस बापानें [ कौशांब विश्वामित्राचा बाप यानें ] ऋचिक भार्गव ( भृगु ऋषीचा पुत्र च्यवन त्याचा पुत्र ऋचीक नावाचा ) जो त्याला ही दिली म्हणून ती ऋषिस्त्री झाली.   ६२

# स्कंद पुराण रेणुका महात्म्य अध्याय. ६

**स्कंद उवाच. इक्ष्वाकुरिति विख्यातो राजासीत्पृथ्वी पतिः**
**तस्य शंभु प्रसादेन भीमो नाम्नाभवत्सुतः १**

स्कंद सांगतात. इक्ष्वाकु असे नावानें विख्यात असा पृथ्वीपति राजा होता त्यास शिवाच्या प्रसादानें भीम नावाचा सुत झाला. १

**पुढें २ पासून अक्रा परयंत श्लोकांत वंश वर्णन आहे.**
**कुशांबः स तपस्तेपे पुत्रार्थी राज सत्तमः १२**

तो कुशांब राजा श्रेष्ठ पुत्रार्थी असून तप तपता ( करिता ) झाला. १२

**पूर्णे वर्षसहस्रे वै सतु शक्रमुपासतः**
**तमुग्र तपसं दृष्ट्वा सहस्राक्षः पुरंदरः १३**

पूर्ण हजार वर्षें इंद्राचें आराधन केलें सहस्राक्षः पुरंदरानें तें उग्र तप पाहून

समर्थः पुत्रजनने स्वयमेवास्य शाश्वतः
पुत्रत्वं कल्पयामास स्वयमेव पुरंदरः १४

समर्थ (इच्छिले अर्थ देता) पुत्र जन्माविषयीं आपणच शाश्वत (निश्चयानें समजून) पुरंदर स्वतः पुत्रपणा स्विकारिता झाला. १४

गाधि नामाभवत्पुत्रो कौशांबः पापनाशनः
पौरुकुत्साभवद्भार्या गाधेस्तस्य महात्मनः १५

पुत्र झाला त्याचें नांव गाधी ठेविलें तोच कौशांब पापाचा नाश करता या महात्म्याला पौरुकुत्सा (नावाची) भार्या होती झाली. १५

कन्यैका सा बभौ तस्य नाम्ना सत्यवती शुभा
तां गाधिर्भृगु पुत्राय ऋचीकाय ददौ द्विजाः १६

त्यास एक कन्या सत्यवती नामक झाली तीला भृगुपुत्र ऋचीक यास गाधी देता झाला (असें ब्राह्मणांस स्कंद सांगते झाले) १६

सत्यवतीच्या उदरीं जमदग्नी जाहला महा तेजा
क्षत्रिय दौहित्र असें ते झाले थोर ऋषि पहाते ज्या ६३

सत्यवतीच्या पोटीं महान् तेजस्वी जमदग्नी झाला. थोर ऋषी ज्याला हा क्षत्रियाचा दौहित्र [दुहिता म्हणजे कन्या तीचा पुत्र] असें पाहते झाले. ६६

सप्ताध्यायीं श्लोकीं तत्पंच दशींच हें असे कथिलें
त्या ऋषि रजतीं समता करिजे कीं काय या द्विजीं कथिलें ६४

त्या रेणुका महात्म्याच्या सातव्या अध्यायांत पंधराव्या श्लोकांत हें सांगितलें तो ऋषी जमदग्नी शुद्धरुपें होय त्याच्या ठायीं बरोबरी इतरहीं [द्वेष करणारीं ब्राम्हण म्हणविणारीं] कथिलें [कलई करण्याची धातु] यांहीं करावी कीं काय. ६४

## स्कंद पुराण रेणुका महात्म्य अध्याय ७.

ततः सत्यवती पुत्रं जनया मास भार्गवं
तपस्यभिरतं नित्यं जमदग्निं धृतात्मकं १५

मग सत्यवती भार्गव जमदग्नि यास प्रसवती झाली तो शंभर पुत्रांचा अंश एक तपश्चर्येत सर्वकाल रत राहता झाला. १५

**तैसीच कथा तिसऱ्या अध्यायीं कथियली असे श्लोकीं**
**एकादशा पुढें जी निरीक्षिजे तीस उत्तम श्लोकीं ६५**

तशीच कथा तिसऱ्या अध्यायांत [ रेणुका माहात्म्याच्या ] अकरावे श्लोकाच्या पुढें लिहिली आहे उत्तम श्लोक [ अद्वैत भाव, कीर्ति ज्यांची आहे ] त्या लोकांही पहावी. ६५

## स्कंद पुराण रेणुका माहात्म्य अध्याय ३.

**कन्याकुब्जा इति ख्याता पुरी पुण्यजनाकुला**
**रम्या भागीरथी तीरे सुर सिद्धर्षि सेविता. १२**

भागीरथी तीरास कन्याकुब्जा नावाची रम्य नगरी आहे चांगल्या मनुष्यांनीं भरलेली देव, सिद्ध, ऋषी, असे जींत राहत होते. १२

**तस्यामासीन्नृपः कश्चित् धार्मिको सत्य संगरः**
**इक्ष्वाकुरिति विख्यातः सर्वशास्त्र विशारदः १३**

तींत खरें युद्ध करणारा धार्मीक असा कोणी इक्ष्वाकु नावाचा सर्व शास्त्रांचा जाणता लौकीकवान् राजा होता. १३

**तस्य वक्षे गुणज्येष्ठः सर्व धर्मभृतां वरः**
**रेणु नामाभवत् पुत्रो इक्ष्वाकु कुलवर्द्धनः १४**

त्याच्या पोटीं गुणानें थोर धर्म धारण कर्त्या सर्वांत श्रेष्ठ इक्ष्वाकुच्या कुलास वृद्धि देणारा रेणु नावाचा पुत्र झाला. १४

**विख्यात पुरी कन्याकुब्जा भागीरथी तिरीं तीचा**
**इक्ष्वाकु अन्य राजा रेणुक तत्पुत्र उदधि नीतीचा. ६६**

कन्याकुब्जा नावानें प्रसिद्ध असी भागीरथी तीरास पुरी होती तीचा राजा दुसरा इक्ष्वाकु नावाचा होता त्यास पुत्र नीतिचा समुद्र रेणुक नावाचा राजा झाला. ६६

**वेदाध्यायीं कथिला त्या इतिहासा विलोकिजे लोकीं**
**सार्धनवा पासुन त्या सार्धचि एकोनविंशति श्लोकीं ६७.**

चवथे अध्यायांत [ रेणुका माहात्म्याचा ] इतिहास जो सांगितला आहे तो लोकांनी पहावा तो साडेनवापासून साडेएकोनवीस पावेतों श्लोकांत आहे ६७

# स्कंद पुराण रेणुका महात्म्य अध्याय ४

एतस्मिन्नंतरे यज्ञे वन्हिकुंडाग्निरेद्विजाः १०

दिव्यरूपान्विता नारी दिव्याभरण भूषिता
दिव्यचंदन दिग्धांगी दिव्यांबर धरा शुभा. ११

या उपरांत द्विजहो दिव्यरूपानें युक्त दिव्य आभरणें करून शोभायमान, दिव्य चंदन आंगास चर्चिला आहे; दिव्य वस्त्रे धारण केलेली अशी उत्तम यज्ञांत कुंडाग्नितून निघती झाली. ११

रत्नकुंडल जुष्टांगी श्रीरिवायत लोचना
रूपेणाप्रतिमा गंगा गौरी तेज समन्विता १२

रत्नकुंडलें आंगासि जडली आहेत लक्ष्मी प्रमाणें प्रफुल्ल कमलासारखे नेत्र रूपानें गौरी गंगेचें तेज एकत्र करून झालेली असी अप्रतीम.

बहु शीतांशु बिंबास्या सहसा चादितिर्गिरेत
तां दृष्ट्वा चारु सर्वांगीं मुनयः सुर चारणाः १३

बहुत चंद्रांचें तेज आहे मुखास असी अदितीचा अवतार उत्पन्न झाली तीला सर्वांगें उत्तम अशीला पाहून मुनि, देव चारण. १३

पुष्पवर्षं सुराश्चकुस्तुष्टुवंतो वर मूर्द्धनि
सुर दुंदुभयो नेदुर्मृदंग पणवांस्तथा. १४

तीच्या श्रेष्ठ शिरावर देव पुष्पवृष्टी करिते झाले आणि स्तविते झाले तसेच दुंदुभी मृदंग पणवानक वाजविते झाले. १४

तस्यां देव्याच जातायां वीणा वेणुक निस्वनः
ततः प्रहृष्ट मनसः सुर सिद्ध मुनीश्वराः १५

ती देवी उत्पन्न होतांच विणा वेणु यांचे नाद झाले मग सुर सिद्ध मुनीश्वर यांचीं मनें हर्षित झालीं. १५

एकवीरेति विख्याता गौरी गंगेतिचाब्रुवन्
ऋषिभिर्देव गंधर्वैर्वद्यमाना मुनीश्वरैः १६

ऋषी देव गंधर्व मुनीश्वर याहीं वंदन करावी असी योग्य एकवीरा गंगागौरी हीच असें बोलूं लागले. १६

रेणुरंके समादाय पूजयामास रेणुकां
वस्त्राभरणैर्दिव्यैर्गंधमाल्यानुलेपनैः १७

रेणु राजानें त्या रेणुकेला मांडीवर घेऊन वस्त्रें आभरणें गंध सुगंध लेपनानें पुजून. १७

राजा सत्कारयामास रेणुकामघ नाशिनीं
ततस्त्ववभृथं कृत्वा पूजयित्वा सुर द्विजान्. १८

पातकाचा नाश करणारी रेणुका तिला राजानें सत्कारून मग अवभृथ केलें ( मंगल स्नान केलें ) आणि देव ब्राह्मणांस पूजून. १८

रत्नैरुच्चावचैर्वस्त्रैस्तोषयामास भक्तितः
एकवीरैवमुत्पन्ना रेणुकस्य गृहे शुभे. १९

उंचउंच रत्नें आणि वस्त्रें यांनी भक्तीनें तोषविलें असी रेणुका रेणुकराज्याच्या उत्तम घरीं उत्पन्न झाली. १९

सर्वलक्षण संपन्ना वन्हिकुंडादयोनिजा
सर्व लक्षण संपन्न असी अयोनि संभव अग्निकुंडांतून.

## १८-१९-१९॥ ह्यांचा सरल अर्थ

देव ब्राह्मणास पूजून उंचउंच रत्नें वस्त्रें याहीं भक्तीनें तोषवून पातकाचा नाश करणारी रेणुका तिला राजानें सत्कारून मग अवभृथ केलें. असी सर्व लक्षण संपन्न अयोनिसंभव अग्निकुंडांतून रेणुक राज्याच्या उत्तम घरीं रेणुका उत्पन्न झाली. १८।१९।१९॥.

रेणुक राज्या ईश्वर वरेंकरुनि अग्निकुंडजा कन्या
हो ख्यात एकवीरा गौरी गंगे हुनीहि ती धन्या. ६८

रेणुक राजाला ईश्वर वरदानें करून अग्निकुंडा पासून उत्पन्न झालेली गौरी गंगेहून धन्य असी कन्या झाली ती नावानें एकवीरा होय. ६८

**तातें स्वयंवरातें आमंत्रुनि आणिले ऋषी राजे**
**मागुन जमदग्नी ये त्या उडुनिकरांत तो शशी साजे. ६९**

तीच्या स्वयंवरा करितां बापानें ऋषी आणि राजे बोलावून आणिले त्यां सर्वां मागून जमदग्नी आला-तो त्यां नक्षत्रांत चंद्र असा शोभला. ६९

**तातें प्रियकन्येला आणुनि ऋषि बाहुज्गांस दाऊनी**
**सांगे अनुरूपातें वरिजे अंतीं विचार पाहूनी. ७०**

बापानी प्रियकन्येला आणून ऋषी आणि राजे [ त्यांचें नांव गांव वर्णून ] दाखऊन तुजला रूपानें आणि गुणानें आणि शीलानें योग्य वाटेल त्यास वर असें सांगता झाला. ७०

**तीणें विलोकितां तो तपतेजें होय समाचि सूर्याच्या**
**रत्न सुम स्रक्कंठीं घाली जमदग्निच्या महार्याच्या. ७१**

तीणें पाहतां तपश्चर्येच्या तेजानें सूर्या सारिखा तेजस्वी जमदग्नी आहे असें पाहून रत्नें आणि फुलें यांची माळ जी होती ( तिच्या हातांत ) ती महाश्रेष्ठ जमदग्नी याच्या गळ्यांत घातली. ७१

**दशमाध्यायिं कथा हे सहषोडश पंचविंशति श्लोकीं**
**निर्दिष्ट असे तीतें विलोकिजे ध्याननिष्ठ त्या लोकीं. ७२**

दहाव्या ( स्कंद पुराण रेणुका माहात्म्याच्या ) अध्यायांत सोळावा श्लोक धरून पंचविसा पावेतों श्लोकांत दाखविलेली आहे ती कथा ध्याननिष्ठ लोकाहीं पाहवी. ७२

## स्कंद पुराण रेणुका माहात्म्य अध्याय १०

**ततस्तेन स्मृतौ वेगादृषिभिः परिवारतौ**
**जमदाग्नि ऋचीकौ तौ जग्मतुस्तत्स्वयंवरं. १६**

मग त्याणें [ रेणु राजानें ] स्मरण केलेले दोघे ऋचीक आणि जमदग्नि वेगानें ऋषि-परिवारा सहीत त्या स्वयंवराला चालले. १६

तावायातावृषी दृष्ट्वा मंडपद्वार संस्थितौ
ताभ्यां मुदान्वितो रेणुः प्रणाममकरोद्द्विजाः १७

हे ऋषी ( द्विजहो ) ते आलेले ऋषी मंडप द्वारीं उभे राहिलेले पाहून त्या दोघांस रेणु राजा हर्षित झालेला प्रणाम करिता झाला.

पाद्यार्घ्याचमनीयाद्यैः स्वागतं कृतवान्नृपः
विचित्रेचासने दत्वा पूजयामास तौ मुदा. १८

त्या दोघांस राजा आलां, बरे आहां, असें पुसता झाला आणि अर्घ्य पाद्य आचमनीय आदिकरून विचित्र आसनें देऊन हर्षानें पूजिता झाला. १८

ततः प्रणम्य संपूज्य तावृषी रेणुक स्वयं
आव्हयामास तां कन्यां रूपेणाप्रतिमां शुभां. १९

मग पुनः नमस्कार करून त्या दोनी ऋषींस रेणुक राजानें पूजून स्वयें ती कन्या रेणुका रूपानें अप्रतिम सुंदर असीला बोलावून. १९

तामाहूय जगद्धात्रीमेकवीरां नृपेश्वरः
शृण्वतां मुनि भूतानामिदं वचन मब्रवीत्. २०

सर्व मुनी आणि इतर यांच्या ऐकण्यांत येईं असें तिला जगताच्या पालन कर्तीला जवळ घेऊन राजा वचन बोलता झाला. २०

रूप लक्षण संपन्नं यमिच्छसि वरानने
एतेषां राजपुत्राणां मुनीनां पश्य तंपतिं २१

हे वरानने हे ऋषी आणि राजपुत्र आहेत यांतून रूप आणि लक्षणें करून संपन्न अशा ज्याला पति इच्छिसील त्याला पहा. २१

पितुस्तद्वचनं श्रुत्वा दिव्याभरण भूषिता
सर्वानालोकयामास जमदग्निमृषिंच तं. २२

बापाचें वचन ऐकून दिव्याभरण भूषित जी तिणें जमदग्नि ऋषीला आणि सर्वांस पाहून २२

ज्येष्ठानपश्यत्पितृवत्कनिष्ठान्पुत्रवत्तथा
समान वयसश्चैव भ्रातृभिः समैक्षत. २३

वडील होते त्यांस बापाप्रमाणें पहात, लहान होते त्यांस पुत्राप्रमाणें आणि समवयी (बरोबरीचे जे) होते त्यांस भावासारिखे पाहती झाली. २३

**एवं सर्वान् ऋषीन् राज्ञः परित्यज्य शुभानना**
**एकवीरा स्वयं वव्रे जमदग्नि मुनीश्वरं. २४**

असे सर्व ऋषी आणि राजे यांजला टाकून जमदग्नि मुनीश्वराला त्या सुमुखी एकवीरेनें स्वयें वरिलें. २४

**पित्रा सैवमनुज्ञाता रेणुका स्वयमादरात्**
**प्रक्षिपद्रत्न पुष्पाढ्यां मालांतु जमदग्नये. २५**

बापानें आज्ञा दिलेली रेणुका स्वयें आदरानें रत्न, पुष्पयुक्त श्रेष्ठ माळा ती जमदग्निला घालिती झाली. २५

**ती जमदग्नीची स्त्री झाली तद्गर्भि पांचवा राम**
**हो परशुधर म्हणति ज्या दे तो मुनिजन मनांस आराम ७३**

ती जमदग्नीची स्त्री रेणुका [एक वीरा] झाली. तीच्या गर्भांत [वसु १, विश्वावसु २, बृहत्कण्व ३, बृहद्भानु ४] आणि पांचवा रामपरशुधर ज्याला म्हणतात जो मुनिजनांला आराम देणारा तो झाला. ७३

**श्री रेणुका महात्मीं अध्याय त्रयोदशीं असे कथित**
**चत्वारिंश श्लोकाच्छद्चत्वारिंशतांतरीं ग्रथित. ७४**

श्रीरेणुका महात्मांत तेरावे अध्यांत चाळिसावे श्लोकापुढें सेच्याळीस पावेतों श्लोकांत वोविलेली कथा सांगितली आहे. ७४

# स्कंद पुराण रेणुका महात्म्य अध्याय. १३

**जगत्त्राणाय विष्णुस्तामेकवीरामचिंतयत्**
**चिंतइत्वा स्वयं विष्णुर्मात्रां तां विश्व मातरं. ४१**

• जगताचें रक्षण करण्यास त्या एक वीरे विश्वमातेला आपल्या मातृ स्थानीं मानून विष्णु तीतें चिंतिता [सर्व काळ स्मरता] झाला. ४१

स रेणुकायास्तत्पुण्यादुदरंमाविशत्तदा
स्वयं प्रकाशयन्विश्वं हरिस्त्रिभुवनेश्वरः ४२

तो विष्णु त्या रेणुकेच्या पुण्यानें तिच्या उदरीं प्रवेश करिता झाला तेव्हां तो त्रिभुवनेश्वर हरी आपण विश्व प्रकाशिता झाला. ४२

यदा मातुः स्थितो गर्भे तदाभूत्कौतुकं महत् ।
धारयंती यदा गर्भे रामम् कमललोचनं. ४३

मातेच्या गर्भांत राहिला तेव्हां मोठें कौतुक झालें कमल लोचन राम यास गर्भांत धरिती झाली तेव्हां. ४३.

पदं मादात्सुललितं चचालोर्वी ससागरा ।
चेलुस्ते गिरयः सर्वे वनान्यपिच कंपिरे. ४४

पाय उचलून पुढें ठेविल्यानें समुद्रासहीत पृथ्वी हालूं लागली, पर्वत हालूं लागले, वनें कंपायमान झालीं. ४४

दिशोदशाभवन्पुण्याः सुप्रभाताभवन्निशा ।
ततस्त्वदिति नक्षत्रे तृतीयायांतु माधवे. ४५

दाहादिशा प्रकाशित झाल्या रात्रींच्याठायीं प्रकाश होऊं लागला वैशाख महिन्यांत तृतीया तिथीस कृत्तिका नक्षत्रीं. ४६

रेणुकायास्तदागर्भादुदितः स हरिर्विभौ ।
पुष्पवृष्टिरभूत्तत्र रामदेवस्य मुर्द्धनी. ४६

रेणुकेच्या गर्भापासून हरि उत्पन्न झाला तेथें त्या रामदेवाच्या शिरीं पुष्पवृष्टी झाली. ४६

तो हि क्षत्रिय दुहितात्मज झालासे नसेचि अन नातें ।
तो सर्व बाहुजघ्न झाला वाटे असत्य मननातें. ७५

तो परशुराम क्षत्रियाच्या कन्येचा पुत्र झाला आहे, दुसरें कांहीं नातें नाहीं. तो सर्व क्षत्रियानां मारणारा झाला हें मननकरून पाहतां खोटें वाटतें. ७५

जरिं मातृ पितामहिच्या जनका बंधूंस वा तदात्मज यां ।
वधिता तरिं कीर्तितेंनच होता पात्र तो सदात्मजयां. ७६

जर आई आणि बापाची आई यांच्या बापास; भावांस आणि त्यांच्या (भावांच्या) पुत्रांस मारिता तर कीर्तीला आणि त्याच्या (रामाच्या) चांगल्या जयाला तो (राम) पात्र झाला नसता. ७६

**निःक्षत्रिया धरा जरिं होती तरिं मातृवंशहा यास ।**
**वदते सकलऋषी कीं होता कीं काय त्यां महायास. ७७**

जर पृथ्वी निःक्षत्रिय झाली असती तर याला मातेचा वंश मारणारा असें सारे ऋषी म्हणतेना! त्यांना असें ह्मणण्यास कांहीं अयास होतें कीं काय. ७७

**जरिं गोत्रवधा करिता तरिं गोत्रवधाघ यास घडतें कीं ।**
**तेणें सुब्राह्मण्य याचें निःशेष तें विघडतें कीं. ७८**

जर असा गोत्रवध करिता तर त्यास गोत्रवधाचें पातक होतें कीं नाहीं आणि त्या योगानें त्याचें उत्तम ब्राह्मण्य (ब्राह्मणपण) सारें नाहींसें होतें कीं नाहीं. ७८

**गतलेखनिं सह्याद्री खंडीं अध्याय होय चवतीस ।**
**गणपति प्रश्न श्लोकीं त्रिःसप्तति जी कथा सु चव तीस. ७९**

मागें लिहिल्यांत सह्याद्री खंडांत चवतीसावा अध्याय जो आहे त्यांत गणपतिचा प्रश्न त्र्याहत्तर श्लोकांत आहे त्या कथेला फार गोडी आहे. ७९

**भरताद्य कार्तवीर्य सोमकुलीं जाहले उमाज वदे**
**हो तत्सेनापति शशिवंशज शशिसेन त्यास तो जय दे. ८०**

भरत कार्तवीर्य आदिकरून राजे सोम वंशांत झाले असें गणपती बोलले (श्रीमद्भागवत नवमस्कंध. अध्याय तेवीस. श्लोक १८ पासून २७ पावेतों ययातीचा यदु १, त्याचा सहस्त्रजित् २, त्याचा शतजित् ३, त्याचा हैहय ४, त्याचा कुंत ५, त्याचा भद्रसेन ६, त्याचा धनक ७, त्याचा कृतवीर्य ८, त्याचा अर्जुन ९. ह्याचा वंश पुढें दाखविला आहे. सहस्त्रार्जुनापुढें.

**तस्यपुत्र सहस्त्रेषु पंचैवोर्वरिता मृधे ।**
**जयध्वजः शूरसेनो वृषभो मधुरूर्जितः २७**

अर्थ.—त्याचे पुत्र १००० त्यांतून युद्धांत पाच उरले त्यांचीं नावें. जयध्वज १, शूरसेन २, वृषभ ३, मधु ४, ऊर्जित ५. ह्यांची संतती जे तेच वृष्णी आदिकरून यादव वंश होता. पांडवादिक हे पुरूचा वंश पौरव होता.

बहुतकरून हिंदुस्थानांत यांचे वंशज क्षत्रिय आहेत. हैदराबादच्या पातशाचे दीवाण महाराजा चंदूलाल होऊन गेले ते आपल्यास कार्तवीर्य सहस्रार्जुनाचा वंश असें ह्मणवीत होते.

क्षत्रिय शद्बाचा अपभ्रंश हिंदुस्थानी भाषेनें खत्री झाला आहे.
(प. ख. योः सावर्णः)

ही गोष्ट मुंबईत कांदेवाडीत राहणार शोधक गृहस्थ रा. रा. दामोदर रामचंद्र हे मान्य करितात.) त्या कार्तवीर्याचा सेनापति चंद्रसेन चंद्रवंशी (सोमवंशी) जो होता तो कार्तवीर्याच्या पराक्रमाला वेग (गती) वाढ उत्कर्ष देता झाला. ८०

**तसि रेणुका महात्म्यीं ती युद्धकथा सविस्तरें कथिली ।**
**चत्वारिंशत्सपुढें अष्टाध्यायीं हरारमजें तिथिली. ८१**

असी तेथील कथा रेणुका महात्मांत चाळीसाव्या अध्याया सहीत पुढील आठ अध्यायांत युक्त सविस्तर सांगितली आहे. ८१

**अध्याय सप्तचत्वारिंशत्यभ्यंतरीं कथा पाहे ।**
**अर्जुन वधूनि राम दे सकला तद्बलास तापा हे. ८२**

सत्तेचाळीसाव्या अध्यायांत ही कथा आहे कार्तवीर्यार्जुन मारून त्याच्या सर्व सैन्यास परशुराम ताप देता झाला आहे ती पहा. ८२

**राजर्षि चंद्रसेन ज्याणें युद्धांत राम तापविला ।**
**तो त्या वधी महात्मा जारें होता सुदृढ भंगिता पविला. ८३**

राजर्षि चंद्रसेन ज्याणें परशुरामाला युद्धांत फार ताप दिला होता तो आपल्या शूरत्वानें वज्रालाही मोडणारा होता तरीं ही महात्मा (जगदाधार विष्णुचा आत्मा) जो परशुराम तो त्या चंद्रसेनाला वधिता झाला. ८३. ९१ आर्येवरील अर्थ पहा.

**तैं चंद्रसेन भार्या जी होय सुमंतुराज ऋषिदुहिता ।**
**दाल्भ्याश्रमास गेली पतिवीर्याज्जात गर्भ त्यासहिता. ८४**

तेव्हां चंद्रसेन राजऋषीची स्त्री सुमंतु ऋषीची कन्या तीच्या उदरांत पतिवीर्यापासून गर्भ झालेला होता त्यासहीत ती दाल्भ्याश्रमास गेली. ८४

आचार्याश्रित कमला असतां प्रभु क्षत्रहा तया जवळ।
येतां गमे सतीला आलासे काळहा करूं कवळ. ८५

ती कमलासती गुरुच्या आश्रयांत असतां परशुराम क्षत्रिय मारणारा त्या (दाल्भ्या) पासीं गेला तेव्हां कमलेला वाटलें कीं, काळच हा घास करावयास आला. ८५

दाल्भ्यासि राम याची स्वकामनापुर्ति दाल्भ्य हो त्यातें।
अन्योन्य तुष्ट झाले स्वार्थवितरणीं वदान्य होत्यातें. ८६

रामाची इच्छा (चंद्रसेनाची भार्या कमला आपल्या हातीं यावी असी) होती ती पूर्णकर असें मागूं लागला तेव्हां दाल्भ्यही (आपल्यास कमलेचा गर्भ रक्षावयाचा) ती आपापली कामना गुप्त रीतीनें मागीतल्या असतांही परस्परानें आपापलें प्रिय तें दान करण्यास उदारत्व घेणारांस परस्पर (राम आणि दाल्भ्य) संतुष्ट झाले. ८६

भोजन तांबूला नंतर मागे राम क्षत्रि जायेतें
दे दालभ्य तें सतिमनां ये भय वृकदर्शनीं अजा ये तें. ८७

भोजनें झाली तांबूलें (विडे) घेतल्यावर रामक्षत्रियाची जाया [चंद्रसेन स्त्री कमला] इजला मागता झाला दालभ्यानें देतों ह्मणून स्वाधीन केली तेव्हां लांडग्याला पाहून शेळीच्या मनाला भय वाट्तें तसें कमलेला वाटलें. ८७

परितुष्ट होउनि वदे रामहि दालभ्यासि भो ऋषे याची
मागे तदुदरगा तें घे चातकिं राम वृत्ति तोयाची. ८८

राम संतुष्ट होऊन दाल्भ्यास ह्मणूं लागला अहो ऋषी मागा. दाल्भ्यानें तीच्या (कमलेच्या) उदरीं असलेल्या गर्भाला मागतां परशुरामानें चातकापासीं पाण्याचा स्वभाव [चातक पक्षी तोंड पसरून मेघाजवळ पाणी मागत असतो तेव्हां पाऊस लागून थेंब त्याच्या चोंचींत पडतात तसा] घेतला. ह्मणजे गर्भासहीत कमलासती परत दिली. ८८

भगवान्दाल्भ्यास ह्मणे ज्या करितां येथ पातलों गा मी
तें तूं मागसि जरिं तरिं आतां स्वच्छंद जाहलों गामी. ८९

हे दाल्भ्य ज्या करितां मी येथें आलों तेंच तुह्मी मागतां असें जरीं आहे तरीं तुह्मांला वचन दिल्यामुळें तुमच्या छंदानीं चालणारा मी झालों आहें. असें परशुराम बोलता झाला. ८९

**कायस्थ गर्भ उत्तम मार्थुन तूं मागसी जरि माझा**
**कायस्स्थचि आल्या हो त्या माझी मान्यहो तरीं आज्ञा. ९०**

हे जाणत्या ( दाल्भ्या ) शरीरांत असलेला उत्तम गर्भ प्रार्थना करून तूं मागतोस तर याचें सामान्य नाम कायस्थ ( शरीरांत असणारा अथवा असलेला ] असें होवो आणि ही माझी आज्ञा त्याला मान्य होवो. ९०

**हा क्षत्रिय पुत्र ह्मणुनि बहुधा हा क्रूरकर्म अवलंबी**
**होयिल त्या त्यापासुनि वारी तूं हें नटाकुनि विलंबीं ९१**

हा क्षत्रिय पुत्र आहे म्हणून हा क्रूर [ द्रविडापासीं मिळालेल्या रेणुका महात्मांत एकेचाळिसाव्े अध्यायांत आरंभापासून पंचवीस श्लोक पूर्ण होई पर्यंत चंद्रसेन आणि राम यांचें युद्ध आहे तेथें रामानें चंद्रसेनास मारण्या करितां गणपति आणि शिव यांचें सहाय्य घेऊन मारिलें. तें स्मरून बापाचा सूड घेण्यास प्रवर्तेल आणि आपण निःशस्त्र असलों तरी मारील असी परशुरामास भीती होती त्या ] कर्माचें अवलंबन करील त्याला अवकाशावर न टाकितां त्या कर्मांपासून वार. ९१

**हासुनि दाल्भ्य म्हणे हे भगवन् दुर्बुद्धि कधिं नहोयिल हा**
**संदेह करुनको या संकेतीं तूं प्रभूत कीर्ति लहा. ९२**

हें ऐकून दाल्भ्यऋषी हांसून म्हणतो हे भगवंता [ भाग्यशीला ] हा कधीं दुर्बुद्धि होणार नाहीं यांत संशय धरूं नको याला ठेविलास ह्या मोठ्या कीर्तीस तूं पाव. ९२

**ऐसें करुनि गेला रामापर क्षत्रियांस हो भयद**
**उत्पन्न चांद्रसेनी हो पितरां सुख गती अहोभयद. ९३**

या प्रमाणें करून राम गेला, दुसरे क्षत्रिय जे होते त्यांस भय देता झाला. आणि इकडे चंद्रसेनाचा पुत्र चांद्रसेनी पितरांस सुख आणि गती असीं दोनी देणारा उत्पन्न झाला. ९३

**क्षत्रियवीर्यें क्षत्रिणिउदरीं हो म्हणुनि शुद्ध संतान**
**श्री दाल्भ्यमुनि प्रसादें झाला क्षत्रिय कुलास संतान. ९४**

क्षत्रिय [ चंद्रसेन राजर्षि ] याच्या वीर्यानें क्षत्रिणि [ विधिकरून उद्वाहित श्री धर्म पत्नी कमला ] इच्या उदरीं झाला ह्मणून ही संतती शुद्ध [ **याज्ञवल्क्य स्मृतिः आचारा**

ध्याय श्लोक ९० सवर्णेभ्यः सवर्णासु जायंतेः हि सजातयः अनिंद्येषु विवाहेषु पुत्राः संतान वर्धनाः अर्थ. सवर्णा पासून सवर्णा स्त्रीचे पोटीं म्हणजे जावर्णाचा पुरुष त्याच वर्णाची स्त्री सजातीय आणि यथाविधि लग्न केलेली निंद्य [ निंदेस पात्र ] नाहीं असे स्त्रीस त्या पुरुषा पासून संतती होते ते " सजातिय पुत्र " संतान वृद्धीस पावविणारे तेच. ] श्री दाल्भ्यमुनींच्या प्रसादानें क्षत्रियकुलास इच्छिलें देणारा मूर्तिमंत " संतान " [ कल्पवृक्षच ] झाला. ९४

**रामाज्ञेनें ऋषि तो क्षत्रिय धर्माहुनी करी पर त्या**
**उपजीवनार्थ दे गुरु लेखन वृत्ती सु धारणा धरित्या. ९५**

रामाच्या आज्ञेनें तो दाल्भ्य ऋषि त्या सोमराजाला क्षत्रिय धर्मापासून दूर करिता झाला [ दुसरे लोकांस ताप देणें अशा क्रूरकर्मा पासून दूर करिता झाला. ] असी उत्तम धारणा धरित्याला उपजीवनार्थ लेखनवृत्ती दिली. हेमाद्रि प्रबंधांत कथा आहे. चित्रगुप्ताच्या सहा कन्या शिवाच्या आज्ञेनें चांद्रसेनीस दिल्या तेव्हां सासऱ्यानें लेखन विद्या आंदण दिली. अध्याय २४ उत्तरार्ध श्लोक ७० पासून अठ्याऐंशीं ८८ पहा. ९५

**दाल्भ्योपदेश घे तो यज्ञादिक कर्म निरत होय सदा**
**चारें संपन्न असे हरीश आर्चन निमग्न होय सदा. ९६**

तो चांद्रसेनी ज्याचें नांव सोमराज दाल्भ्याचा उपदेश घेऊन यज्ञादि कर्मांत रत सदाचार संपन्न आणि विष्णु शिव यांच्या अर्चनांत सर्वकाळ निमग्न होता झाला. ९६

**कायस्थ चित्रगुप्त कन्या झाली तया प्रती वरती**
**त्या वंश वृद्धि हो जी ते क्षत्रिय वेद धर्म आचरती. ९७**

चित्रगुप्त कायस्थाची कन्या त्या सोम राजाला [ चांद्रसेनीला ] वरिती झाली. त्याला जी वंश वृद्धि झाली ते क्षत्रिय वेदधर्म आचरतात. ९७

श्री गागाभट्ट कृत कायस्थ पद्धती प्रकरण पहिलें ( शके १७९४ सालीं छापिलेली प्रत ) पान १ लें याजवरील पंक्ति १९–२०–२१ " जामदग्न्य कृत क्षत्रिय वध काले चंद्रसेनस्य राज्ञो भार्यायाः—सगर्भायाः दाल्भ्या श्रमं गतायाः गर्भवधार्थमागतस्य जामदग्न्यस्य दाल्भ्यमुनि प्रार्थितस्य शापेन क्षत्रियत्वमुत्सृज्य कायस्थत्वं प्राप्तस्य संततिः **साच दक्षिण देशे प्रभु नामकत्वेन प्रसिद्धा.** " तिसरे अध्यायांत काशिस्थ पंडितांच्या पत्रांत **चत्वारस्तनयो आसन्०** या श्लोकावर तें पहा.

**गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, जातकर्म, अहो**
**आख्याकर्म, निष्क्रमण, अन्नाशन, चौल, मौंजिबंधन, हो ९८**

गर्भाधान १ पुंसवन २ सीमंतोन्नयन ३ जातकर्म ४ नामकर्म ५ निष्क्रमण ६ अन्न-प्राशन ७ चौल ८ मौंजीबंधन ९.

**दान, महाव्रत, तत्पर, होय उपनिषद्धितें त्रयोदशम**
**गोदान समावर्तन अणिविवाहपुत्रकाम षोडशम ९९**

दान १० महाव्रत ११ महानाम्निव्रत १२ उपनिषद्व्रत १३ गोदान १४ समावर्तन १५ विवाहपुत्रकाम १६ श्री गागाभट्ट कृत कायस्थ पद्धति (शके १७९४) प्रकरण १ पान १६ पंक्ति १३।१४ पंक्ति १९।२०।२१।२२ पहा. याहून अधिक माहिती पाहिजे तर अनंतदेव कृत संस्कारकौस्तुभ ग्रंथ घेऊन पहा. ९९

**सोळा संस्कार असे कीजे सद्वेद मंत्र पठनानें**
**क्षत्रिय कुळीं असे वर ऋषिसंमत तें कळे सु घटनानें १००**

हे सोळा संस्कार वेदमंत्र म्हणून करावे असा या क्षत्रिय कुलास ऋषिजनांहीं मान्य केलेला वर आहे. हें पुष्कळ ग्रंथ पाहिल्यानें कळतें. १००

श्री गागाभट्ट कृत कायस्थ पद्धति. (शके १७९४) प्रकरण १ पान १३ पंक्ति १३ **"चित्रगुप्त चांद्रसेनीय कायस्थयोः वेदोक्त मंत्रसहिता क्रियास्तास्तु मत्कृत कायस्थ प्रदीपे द्रष्टव्याः"**

**अर्थ**—चित्रगुप्त कायस्थ आणि चांद्रसेनीय कायस्थ यांच्या वेदोक्त मंत्रसहित क्रिया ज्या त्या माझा केलेला कायस्थ प्रदीप नावाचा ग्रंथ त्यांत पहाव्या म्हणजे कळतील.

**यत्किंचित्कर्मी श्रुतिमंत्र जप नवग्रहादि यज्ञांत**
**योग्याधिकार यां हो कथित महेशोक्त स्कंद सूज्ञांत. १०१**

यत, किं, चित [हें वाक्य अगदीं थोड्या कर्मसंख्येचें समजून उपयोगांत आणितात परंतु याचीं पदें तीन पडतात त्यांचा विचार] यत म्हणजे जें १ कीं म्हणजे कांहीं २ चित् म्हणजे पूर्ण सूक्ष्म सर्व व्यापक ३ असा अर्थ होतो. हें अर्थवैपरित्य असें कोणी म्हणतील तर स्कंद पुराण रेणुका महात्म्य अध्याय ४७ श्लोक ५९—

**यत्किंचिद्वैदिकं जाप्य नवग्रह मखादिकं**
**नानाशांतिश्च विधिवदृत्विग्भिरेव कारयेत्.**

अर्थ—जें कांहीं सर्व (कर्म) तें वैदिक [वेदानें कथिलेलें] किंवा केलेलें वेद मंत्र जपून नवग्रहमख आदिकरून नानाशांति ज्या त्या ऋत्विक् ह्मणजे यज्ञकर्ते ब्राह्मण यानीं किंवा त्याच्या साह्यानें कराव्यात असा अर्थ होतो. ह्यांत नवग्रह आदिकरून ह्मणजे सर्व यज्ञ आले, हे आणि नानाशांति, ह्मणजे सर्वशांति हीं कर्में थोडासा वेद ह्मणाल्यानें कशीं होतील. तर येथें सर्व वेद पाहिजेत. या अर्थास अनुकूल श्रीमत् शिवपुराण अध्याय १९ श्लोक २८—

**दानानिच तथा पूर्वे तिर्थानि विविधानिच**
**वाङ्मनः कायजं किंचित्पुण्य स्मरण संभवं.**

अर्थ—दानें, तीर्थें, काया, वाचा, मन, स्मरण. यां पासून उत्पन्न झालेलें पुण्य सर्व कांहीं अपूर्व जें तें. असा होतो. यांत हें दिसतें की, जें, हा अर्थ ज्या पदापासून निघतो तें, यत्, हें पद नाहीं. तेवढें मिळविलें ह्मणजे "यत्किंचित" अर्थ "जें कांहीं सर्व" असा होतो सर्व कांहीं कर्मांत नवग्रहादि यज्ञांत वेद मंत्र ह्मटले पाहिजेत असें षडानन सनत्कुमारादि ऋषींस सांगतात, गागाभट्टी प्रकरण १ लें. पान १३ पंक्ति १३।१४ येथें ही पहा. सुमारें दहा वर्षे झालीं ज्या श्री **गागा भट्ट कृत कायस्थ प्रदीप** ग्रंथाचा शोध करीत होतों तो ग्रंथ शके १८१० सर्वधारीनाम संवत्सरांत चैत्र महिन्यांत प्राप्त झाला. यांत प्रथम रजोदर्शन-शांती पासून ग्रहयज्ञ, सोळा संस्कार [वर लिहिले] आणि तदंगभूत इतर कर्तव्यकर्में सर्व ऋग्वेद मंत्रांसहीत लिहिलेलीं आहेत.

**षट्कर्में मुख्य द्विजि त्या माजी तीन होती क्षत्रांस**
**यजन दुजें अध्ययन दान तिजें पूर्ण करिति सत्रास. १०२**

ब्राह्मण द्विज यांस सहा कर्में त्यांतून क्षत्रियांस तीन यजन १ यांत अग्निहोत्र येतें. गागाभट्टी प्रकरण १ लें. पृष्ट १६ पंक्ति २१ हींत "यजनं अग्निहोत्रादि कर्मं" असें नव्यायीक (न्यायशास्त्र निष्णात) गागाभट्ट लिहितात. अध्ययन २ आणि दान ३ यांत क्षत्रियांचा यज्ञ पूर्ण होतो. स्कंद पुराण सह्याद्रि खंड उत्तर रहस्य अध्याय ४ श्लोक २९.—

**ब्राम्हणानां च षट्कर्म क्षत्रियाश्च त्रि कर्मजाः**
**वैश्याः शूद्राश्च तांत्रीकाः सर्व शास्त्रेषु निर्णयः**

अर्थ–ब्राह्मणाचींच किंवा ब्राह्मणांसच सद्दा कर्में. क्षत्रिय आणि वैश्य तीन कर्मी झाले. ह्यांचीं कर्में वेद मंत्र आणि तंत्र सहीत होणें आहेत. शूद्रांचीं कर्में मंत्ररहित तांत्रीक ह्मणजे तंत्र करून (सव्यापसव्यादिक करणें हें तंत्र) असा निर्णय सर्व शास्त्रांत [ मन्वादि स्मृतींत ] आहे. याज्ञवल्क्य स्मृति आचाराध्याय श्लोक १०

**ब्रह्म क्षत्रिय विट् शूद्रा वर्णास्त्वाद्यस्त्रयो द्विजाः**
**निषेकाद्यात् श्मशानांतास्तेषां वै मंत्रत क्रियाः "**

अर्थ. ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र हे चार मुख्य वर्ण. यांत पहिले तीन द्विज होत ह्मणजे ब्राह्मण, क्षत्रिय; वैश्य हे. तीन यास मौजी बंधन आहे. यांच्या निषेक ह्मणजे गर्भाधान संबंधानें किंवा जात कर्मांत अभिषेक येथून आरंभ करून. श्मशानांत ह्मणजे अंत्येष्टी [ मरण झाल्यावर मैत्राग्नि आणि और्ध्वदेहीक ] पर्यंत ज्या क्रिया त्या वेदमंत्रेंकरून व्हाव्यात. मनु स्मृति. अध्याय २ श्लोक १६

**निषेकादि श्मशानांतो मंत्रैर्यस्योदितो विधिः ।**
**तस्यशास्त्रेऽधिकारोस्मिन्ज्ञेयो नान्यस्य कस्यचित्.**

अर्थ. गर्भाधाना पासून अंत्येष्टि पर्यंत विधि ( अनुष्टान पद्धति आदिकरून ग्रंथ आहेत त्यांत पहा ) द्विजाति [ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य ] यांस करण्यांस अधिकार आहे असें सांगितलें आहे, त्याला ह्या मनुकृत शास्त्र [ वेदाचा अर्थसार ] अध्ययन करण्याचा अधिकार आहे. इतर वर्ण शूद्रादिक, तत्सम आचार पार्षद ( निषाद ) आदिकरून यांस नाहीं. आतां द्विज यांत तीन वर्णाचा समावेश होतो आणि त्यांत मौजी बंधनें होतात या निश्चयार्थ. याज्ञवल्क्य० आचाराध्याय. श्लोक. ३९

**मातुर्यदग्रे जायंते द्वितीयं मौंजिबंधनात् ।**
**ब्राम्हण क्षत्रिय विशस्तस्मादेते द्विजाःस्मृताः**

याचा अर्थ. ब्राह्मण क्षत्रिय वैश्य ह्याचें जनन मातेच्या उदरा पासून प्रथम होतें. आणि मौजीबंधना पासून पुनः जनन होतें. असें दोन वेळा जन्म झाल्यामुळें. द्वि. ज. ह्मणतात. मनुस्मृति अध्याय २ श्लोक ३६ ".

**गर्भाष्टमेब्दे कुर्वीत ब्राम्हणस्योपनायनं ।**
**गर्भादेकादशो राज्ञो गर्भात्तु द्वादशो विशः**

अर्थ. गर्भा पासून आठवे वर्षी ब्राह्मणाचें उपनय करावें. गर्भा पासून अकरावे वर्षी क्षत्रियाचें उपनयन. गर्भा पासून बारावे वर्षी वैश्याचें असीं उपनयनें [ मौंजी बंधनें ] करावीं. श्लोक. ३७

**ब्रम्ह वर्चस कामस्य कार्यं विप्रस्य पंचमे।**
**राज्ञो बलार्थिनो षष्ठे वैस्यस्येहार्थिनो ष्टमे.**

अर्थ. ब्राह्मणांत ब्रह्म कर्मांत "वर्चस' [ वरिष्ठपणा ) मिळविण्यास योग्य व्हावा असें इच्छिणारानें पांचवें वर्षी. क्षत्रियांत बलार्थी व्हावा असें इच्छिणारानें सहावे वर्षी. इहलोकीं अर्थ [ धनादिक ] इच्छिणारे वैश्यानें आठवे वर्षी. मौंजी बंधनें करावीं. श्लोक ३८

**आ षोडशाद्ब्राम्हणस्य सावित्री नातिवर्तते।**
**आ द्वाविंशात्क्षत्रबंधोराचतुर्विंशतिर्विशः**

अर्थ. ब्राम्हणाचा सोळा वर्षे पर्यंत. क्षत्रियाचा बावीस वर्षे, आणि चोवीस वर्षे पर्यंत वैश्याचा मौंजी बंधन [ उपनयन ) काल गेला असें होत नाहीं. हा धर्म आचरण्याला देश चांगला कोणता. मनु स्मृति अ० २ श्लोक ३२

**कृष्णसारस्तु चरति मृगो यत्र स्वभावतः**
**स ज्ञेयो याज्ञिको देशो म्लेंछ देशस्त्वतः परः**

अर्थ. कृष्णसार म्हणजे काळेपाठीचा हरिण जा देशांत स्वभावें करून फिरतो तो यज्ञाचें काम करणारांचा देश [ श्रौत स्मार्त अग्निहोत्र आदिकरून यज्ञ कर्म यजनकर्मात येतें तें यजन कर्त्यांचा देश ] होय याहून इतर जे देश ते याज्ञिकांचे नाहींत. म्लेंछदेश होत. धर्म जो आहे त्याचीं लक्षणें कोणतीं. मनुस्मृति अध्याय २ श्लोक. १२

**वेद स्मृति सदाचारः स्वस्यच प्रियमात्मनः**
**एतचतुर्विधं प्राहुः साक्षाद्धर्मस्य लक्षणं.**

अर्थ.—वेद आणि स्मृति [ शास्त्रें ] सदाचार ( शिष्ट जनाचा आचार ) आणि जेथें शास्त्रानें विकल्प सांगितला [ एकांत एक प्रकार दुसऱ्यांत दुसरा प्रकार ] असेल तेथें जो आपणास प्रिय तो. या प्रकारचें धर्माचें साक्षाल्लक्षण सांगितलें आहे.

याज्ञवल्य स्मृति आचाराध्याय श्लोक ११८.

**ईज्याध्ययन दानानि विहितानि द्विजन्मनः ।**
**प्रतिग्रहाध्यापनं च ब्राम्हणस्यैव याजनं.**

**अर्थः**—यजन ( वेद शास्त्राध्ययन करून यज्ञ करणें ) आध्यायन ( वेद शास्त्र शिकणें आवृत्ती करणें ) दान ( कांहीं संकल्प करून देणें ) हीं द्विजन्मे ( जे मौंजीबंधन करून वेदग्रहण करितात ते, याहीं करण्यास योग्य. प्रतिग्रह [ संकल्प केलेलें ] दान घेणें. अध्यपन [ शिकविण्याची शाळा ठेवून वेद शास्त्र शिकविणें ] याजन [ आचार्यत्वाची वरणी घेऊन आचार्य होऊन यजमानाचें कर्मकरून त्या मेहनतीचा बदला दक्षिणा घेऊन कर्मश्रेय यजमानास देणें ] हीं तीन कर्में द्विजांतील ब्राम्हणांचींच. इतर दोन वर्ण [ क्षत्रिय वैश्य [ यांनीं करण्या योगुय नाहींत. **येथें अपवाद आहे.** क्षत्रिय जों क्षत्रिय कर्मी [ धनुष्य धारण प्रजा पालन करीत ] आहे तों पावेतों. याजन कर्म वर्ज्य जेव्हां क्षात्र धर्म न्यस्त करून ब्रम्ह कर्म स्वीकारून विश्वामित्र याज्ञवल्क्यादिकां प्रमाणे होईल तेव्हां याजन कर्ता होईल. गृहस्थाश्रमांत पुत्रोपनयन पर्यंत अध्यापनाधिकार नाहीं उपरांत ऋग्वेद नियमें पुत्रास उपदेश कर्ण्याचा अधिकारी होऊन अध्यापन कर्ता [ स्वपुत्रासं ] होईल. विवाह समयीं कन्यादान आणि दान सांगता दक्षिणा घेण्याचा अधिकारी होईल. असा या वर्ज्रित कर्मांचा अधिकार आहेच. स्पष्ट समजूती करितां पुनः

**इज्याध्ययन दानानि विहितानि द्विजन्मनां ।**
**प्रतिग्रहाध्यापनं च ब्राम्हण स्यैव याजनं.**

**अर्थः**—याचा अर्थ टीकाकार करितात तो तीनकर्में द्विज [ ब्राम्हण क्षत्रिय वैश्य ] यांस उक्त आणि दान घेणें, लोकांस शिकविणें, आणि वरणी घेऊन काम करणें हीं तीन ब्राम्हणांचींच, द्विजांचीं नव्हेत असे म्हणतात. ह्यांत विरोध उत्पन्न होतो तो कसा म्हणाल तर द्विज, आणि विप्र, यांस या तीन कर्मांचा अधिकार नाहीं असें जर आहे तर जों पर्यंत ब्राम्हण झाला नाहीं तों पर्यंत हीं तीन कर्में वर्ज. आतां ब्राम्हण कोण हा प्रश्न उत्पन्न झाला. तो स्पष्ट करणें.

**जन्मना जायते शूद्रः संस्काराद्विज उच्यते**
**वेदपाठी भवेद्विप्रो ब्रम्हं जानाति ब्राम्हणः**

अर्थः—जन्में करून शूद्र असतो. संस्कार नवक उपनयना पर्यंत झालें म्हणजे द्विज होतो, वेद पठन केलें म्हणजे विप्र. होतो आणि ब्रम्ह म्हणजे वेदार्थ जाणेल तेव्हां ब्राम्हण होतो. ब्राम्हणांचीं लक्षणें कशीं या विषयीं संहिता.

**पंडितो विश्रुतः पुत्रः सैव नाम्ना युधिष्ठिरः**
**वैशंपायनमागम्य प्रांजलिं परि पृच्छतिः १**

पांडुपुत्र पंडित [ बहूत विषय जाणता ] विश्रुत [ सर्वांस माहीत झालेला ] तोच युधिष्ठिर ज्याचें नांव तो वैशंपायनापाशीं जाऊन हात जोडून पुसता झाला. १

धर्मराजोवाच. **के च ते ब्राह्मणाः प्रोक्ता किं वा ब्राह्मणा लक्षणं**
**एतदिच्छामि भो ज्ञातुं तद्भवान् व्याकरोतु मे. २**

धर्म ह्मणतो ब्राम्हण म्हटले आहेत ते कोण त्यांचीं लक्षणें कसीं तें मी जाणूं इच्छितों तें तुम्ही मला सांगा. २

वैशंपायन उवाच. **क्षांत्यादिभिर्गुणैर्युक्तस्त्यक्तदंडो निराभिषः**
**न हंति सर्वभूतानि प्रथमं ब्रम्ह लक्षणं. १**

वैशंपायन सांगतात. क्षमेसह शांति आदिकरून गुणानें युक्त काया वाचा मनो विकार आणि मांसभक्षण टाकलेलें, कोणत्याही जीवाची हिंसा करीत नाहीं, हें पहिलें ब्रह्म लक्षण. १

**यदा सर्वं परद्रव्यं पथि वा यदिवा गृहे**
**अदत्तं नैव गृह्णाति द्वितीयं ब्रह्म लक्षणं. २**

जेव्हां सर्व परद्रव्य रस्त्यांत किंवा घरांत न दिलेलें घेत नाहीं तेव्हां दुसरें ब्रम्ह लक्षण. २

**त्यक्ता-क्रूर स्वभावं तु निर्ममो निष्परिग्रहः**
**मुक्तश्चरति यो नित्यं तृतीय ब्रह्म लक्षणं ३**

क्रूरस्वभाव टाकून ममते रहीत आणि कांहीं घेत नाहीं नित्य मोकळा फिरतो तें तिसरें ३

**देव मानुष नारीणां तिर्यग्योनि गतेष्वपि**
**मैथुनं हि सदा त्यक्तं चतुर्थं ब्रह्म लक्षणं. ४**

देव मनुष्य नारी तीर्यग् योनींत झालेल्यांत ही संग करीत नाहीं तेव्हां चवथें. ४

**सत्यशौचं दयाशौचं शौचमिंद्रियनिग्रहः।**
**सर्वभूते दयाशौचं तपःशौचं च पंचमं ५**

शुद्धखरें शुद्धदया शुद्ध इंद्रियेंआधीन ठेवणें सर्व प्राणी मात्राची दया आणि शुद्ध तप हें पांचवें. ५

**पंच लक्षण संपन्नो ईदृशो यो भवेद्विजः।**
**तमहं ब्राम्हण ब्रूयां शेषाः शूद्रा युधिष्ठिर ६**

असा पंच लक्षणी जो द्विज ( ब्राह्मण क्षत्रिय वैश्य ) होयील त्याला मी ब्राह्मण म्हणेन, बाकी सर्व शूद्र ६

**न कुलेन न जात्यावा क्रियाभिर्ब्राम्हणोभवेत।**
**चांडालोपि व्रतस्थो हि ब्राम्हणः स युधिष्ठिर ७**

कुलानें किंवा जातीनें ब्राह्मण होत नाहीं चांडाल ही व्रतस्थ आहे तो ब्राह्मण. ७

**एकवर्णमिदं पूर्णं विश्वमासीत युधिष्ठिर।**
**कर्म क्रिया विशेषेण चातुर्वर्ण्यं प्रतिष्ठितं ८**

सर्व विश्व वर्ण एक आहे क्रिया आणि कर्मे याणी चार वर्ण झाले हे युधिष्टिरा.८

**शूद्रोपि गुणसंपन्नो गुणवान्ब्राम्हणो भवेत।**
**ब्राम्हणोपि क्रियाहीनः शूद्रात्प्रत्यवरो भवेत. ९**

शूद्र गुण संपन्न आहे, तर तो ब्राह्मण होयील आणि ब्राह्मण असून क्रियाहीन असेल तो शूद्राहून नीच होयील. ९

ब्राह्मण या शब्दाचा अर्थ जो सत्क्रिय तो ब्राह्मण, जाती विशेष ब्राम्हण नाहीं, हें स्पष्ट होतें, **येथें उत्प्रेक्षा.** असेंच जर आहे तर वर्ण चतुष्टयाचें वर्णन जेथें जेथें आहे तेथें तेथें ब्राह्मणादि चार वर्ण असें कां म्हटलें आहे. **याचें समाधान.** प्रथम उत्पत्ती एका पासून सर्वांची असून त्यांत गुणकर्मानुबंधानें वर्ग चार केले, ते चार वर्ग ईश्वररूपीं विभागून घेतले. पुढें त्याला वर्गातच सजाती संबंधानें उत्पत्ती होवून गुण आणि कर्म तेंच असा जो झाला तो त्या वर्गात गणला गेला. तथापि गुणाचा उत्कर्ष आणि सद्गुण हा ज्यांत झाला तो बरच्या वर्गात गेला जसा विश्वामित्रादि क्षत्रिय समूह ब्रह्म

वर्गीत मिळाला आहे, तसा सदाचरण संपन्न होईल तो श्रेष्ठ वर्गांत मिळाला पाहिजे. या प्रमाणानेंच याज्ञवल्क्य याहीं आचाराध्यायांत लिहिलेला श्लोक ९६

**जात्युत्कर्षो युगे ज्ञेया पंचमे सप्तमेपि वा ।**
**व्यत्यये कर्मणां साम्यं पूर्ववचाधरोत्तरं.**

अर्थ.–जातीचा उत्कर्ष ( कमीची अधीक होणे ) पांचवे किंवा सातवे पिढीस होतो) जो ज्याचा धर्म त्या कर्मांच्या व्यत्ययानें ( कर्म दुसरें धरिल्यानें ) उंच किंवा नीच धर्मा होतो. जो ज्या आचारानें चालतो त्याच्या आचरणास वर्गधर्माचें नांव देतात. विश्वामित्र याज्ञवल्क्यादिक ब्रह्मकर्म कर्ते ब्राह्मण धर्माचरणी; आणि परशुराम, द्रोण, कृपाचार्य हे क्षात्रकर्मकर्ते ते क्षात्रधर्माचरणी असेच प्रसिद्ध आहेत.

तेव्हां जो वर्णधर्म जो चालवितो त्याजला तो वर्ण ह्मटला पाहिजे च. यास्तव ब्रह्मकर्म कर्ते ब्राह्मण, क्षात्रकर्मकर्ते क्षत्रिय, वैश्यकर्मकर्ते वैश्य हे तीनही वर्ण द्विज आहेत. यांस संस्कारकालाची अत्यावधी सांगितली. मनुस्मृती अध्याय २, श्लोक ३८.

**आ षोडशाद्ब्राह्मणस्य सावित्री नातिवर्तते ।**
**आ द्वाविंशात्क्षात्रबंधोराचतुर्विंशतिर्विशः**

अर्थ,–ब्राह्मणं १६ क्षत्रिय २२ वैश्य २४ वर्षे पावेतों सावित्री अतिवर्तित होत नाही त्तो उपनयन करूं शकतात पुढें नाहीं. ही मुदत भरून गेली ह्मणजे **ब्राह्मणाच्या कुळांत जन्मलेला ही शूद्रच राहिला तो शूद्रांत मिळेल आणि शूद्र धर्मा होईल.** तोच शूद्रवर्ण.

सदाचरणी वेदार्थज्ञाता क्षत्रिय वर्णांतील ब्राह्मणच आहे. आणि त्यास दुसऱ्या करितां वरणी घेऊन कर्म करणें वेदादिकांचे अध्ययन करणें आणि दान घेणें हे अधिकार आहेत च. भागवत नववा स्कंध पहा, क्षत्रियां पैकीं पुष्कळ ब्रह्मर्षी झाले आहेत व षट्कर्में करतेच आहेत. ज्यानें दिल्यानें अधिकार दुसऱ्यास येतो. त्या देणारास अधिकार नाहीं हें ह्मणणें डोळ्यावर हात देऊन आंधळा ह्मणण्या प्रमाणें च होय.

ब्राह्मण ह्मणजे एक जाती अशी जी समजूत आहे, तीजविषयीं **जातीभेद विवेकसार** या नावांचा ग्रंथ सन १८६५ इसवींत रा. जोतीबा फुले यांनीं गणपत कृष्णाजीच्या छापखान्यांत मुंबईस छापिला आहे, तो पाहिला असतां चांगलाच खुलासा होतो. .... .... ....

यावरतें लिहिलेल्या सर्व कारणाच्या अर्थानुसार शके १७४७ सालांत श्रीमद्राघवाचार्यां विरुद्ध निळकंठ शास्त्री थंथे याचा वाद चालला होता तेव्हां चांद्रसेनीय कायस्थ प्रभूंत वैदिकी, याज्ञीकी ज्यांही हव्य कव्यादि कर्में स्वतः चालीवलीं होतीं-पुढें शंकराचार्याही निवाडा करून दिल्यावर ब्राह्मण म्हणविणारें यांनीं समेत होऊन कर्में चालविलीं. असा लेखी आधार ( सातारकर चिटणीसांचें पत्र बडोदेकर दिवाणांस) मिळाला आहे.

या वरून चांद्रसेनीयांस षट्कर्माधिकार आहे, असा निश्चय होतो.

च्यार वर्णांच्या धर्मांत ज्या धर्माचें आचरण ठेऊन परंपरेनें तोच धर्म चालविला म्हणजे तो वर्ण म्हटला जातो तसा ब्राम्हण धर्म ज्याणे अवश्य आचरला पाहिजे अशा वर्गास ब्राह्मण नांव दिलें असून तसेंच इतर वर्ण ठरले आहेत. पहा विष्णुबावा ब्रम्हचारि कृत ग्रंथ. **वेदोक्तधर्मप्रकाश- प्रकरण १ वेदोक्तधर्माचा विचार यांतील प्रश्नोत्तराचे अंक १९ पासून ३२ पर्यंत हे** पाहिल्यानें. हा विषय दृढ होयील. त्यांतील १९ पासून २४ पावेतों येथें अवश्य तेवढे घेतों.

१९ **प्रश्न**—वेद शिकण्याचा व शिकविण्याचा अधिकार भूगोला वरील मनुष्यमात्रांस आहे. किं नाहीं.

२० **उत्तर**– ( ह्या उत्तरांत जितके मजकूर कंसांत आहेत तीतके ब्रम्हचारी बावांच्या ग्रंथांत नसून हा ग्रंथकर्ता यानें घातलें आहेत. ]

वेद शिकण्याचा व शिकविण्याचा अधिकार ब्राम्हणाला आहे. परंतु ब्राम्हण कोणाला म्हणावें या विषयीं विचार असा आहे कीं, ज्याची प्रकृती शुद्ध सत्वगुणी असते त्याची स्वाभावीक कर्में असीं असतात कीं, त्याच्या आगीं **शम** असतो. म्हणजे त्याचें अंतःकरण आत्मज्ञानाच्या योगानें शांत असतें व त्याच्या आंगीं **दम** असतो, म्हणजे त्याची इंद्रियें त्याच्या स्वाधीन असतात. हेंच दमाचें लक्षण आहे; व त्याच्या आंगीं **तप** असतें, ह्मणजे तो अष्टांगयोग करणारा असतो हेंच तपाचें लक्षण आहे; ( व त्याच्या आंगीं **शौच** असतें, ह्मणजे तो स्वतः आचार मन आणि शरीर हीं शुद्ध ठेवितो हेंच शौचाचें लक्षण आहे. ) व त्याच्या आंगीं **क्षांती** असते, ह्मणजे तो सर्व कामांत क्षमा ठेवितो. व त्याच्या आंगीं **आर्जव** असतें, ह्मणजे तो सरलपणानें वागतो; व त्याच्या आंगीं **ज्ञान** असतें ह्मणजे तो देहांतील अहंस्फुरण धरणाऱ्या ज्ञानापूर्वीच्या अस्तित्वानें मी निराकार आहे असें जाण-

तो; व त्याच्या आंगीं **विज्ञान** असतें, ह्मणजे जशा जागृत, स्वप्न, सुषुप्ती, ह्या तीन अवस्था सर्व लोकांच्या अनुभवांत असतात तशा त्याच्या ही अनुभवांत तीनही अवस्था असून त्याणे लोकांना ठाऊक नसणारी जी तुर्या अवस्था ती अनुभविलेली असते, हेंच विज्ञानाचें लक्षण आहे. ( व त्याच्या आंगीं **आस्तिक्य** असतें, ह्मणजे अरूप अनाम अलक्ष्य तेंच ब्रह्म मनांत पाहून व्यक्तिमात्रांत तेंच आहे असें जाणून स्वस्ति वाचक चांगला आहे. तुझें कल्याण असो आदिकरून भाषण करण्यास जाणून करितो आणि तसा वागतो, हेंच आस्तिक्याचें लक्षण आहे. ) असीं हीं नऊ [ ९ ] कर्मे सहज स्वभावीक आंगीं असून अथवा त्या नऊकर्मांचे अंकुर असून "**समो नागे मशके**" ह्मणजे हत्ती पासून बारीक जीवा पर्यंत सर्वांत आत्मा समान आहे. व सुखदुःख भोगा विषयीं सर्व सारखे आहेत हा असा त्याला अनुभव असतो, यामुळें तो दयाळू असतो. असा जो सांगितलेल्या लक्षणाचा मनुष्य देहधारी असेल तोच ब्राह्मण ह्मणावा. व अशा प्रकारच्या ब्राह्मणांचा निवडून वर्ग बांधणें या वर्गाल ब्राह्मण वर्ण ह्मणावें. व असे जे ब्राह्मण त्यांलाच वेद शिकून शिकविण्याचा अधिकार आहे. व असे जर सर्व मनुष्य असतील तर सर्वांना अधिकार आहे; परंतु असे मनुष्य नाहीत ह्मणून त्यांना वेद शिकण्याचा मात्र अधिकार आहे. शिकविण्याचा अधिकार नाहीं. कारण त्यांची असी स्थिति नाहीं यामुळें त्यांना वेद शिकविण्याचें गुरुपणं नाहीं. आणि जर असी स्थीति नसून वेद शिकविण्याचें गुरुत्व दिलें तर ते स्वकल्पनेनें पाखांड मत काढून लोकांस कुमार्गांत घालितात ( ब्रह्मचारी बावानें वर्णमानींची ही अनुभावीक खरी गोष्ट लिहिली. ) ह्मणून ब्राह्मण लक्षणें सांगितलीं त्या लक्षणांचा जो नसेल व तीं लक्षणें अंगीं येण्याचें बीज ही नसेल तर तो ब्राह्मण नव्हे व गुरुहीं नव्हे. यामुळें त्याला वेद शिकण्याचा मात्र अधिकार आहे परंतु शिकविण्याचा अधिकार नाहीं. व वेद शिकून दुसऱ्यांस शिकविण्याचा अधिकार वर सांगीतलेल्या उत्तम लक्षणामुळें जो ब्राह्मण ठरेल त्यालाच आहे. व ही वेद नियमित रीत बरोबर आहे.

२१ प्र०—वेद शिकण्याचा मात्र अधिकार आहे शिकविण्याचा अधिकार नाहीं असे मनुष्य असतात त्यांच्या वर्गाला म्हणजे त्यांच्या वर्णांना काय म्हणावें.

२२ उत्तर. वेद शिकण्याचा अधिकार ज्या मनुष्यांना आहे परंतु शिकविण्याचा नाहीं. असे जे मनुष्य, त्या मनुष्यांचे वर्ग, म्हणजे वर्ण दोन केले आहेत. त्यांचीं एक क्ष-

त्रिय व एक वैश्य असीं दोन नावें आहेत. आतां क्षत्रिय कोणास म्हणावें या विषयीं असा विच्यार आहे कीं, ज्याच्या आंगीं **शौर्य** म्हणजे नीति मार्गानें वागण्याच्या कामास हरकत कोणी केल्यास त्याला न भीतां शासन करणें व शस्त्रांनी युद्धांत भीडणें, यालाच शौर्य म्हणावें; **तेज** म्हणजे ज्याचें बुद्धिकौशल्य लोकांत प्रकाशित असतें; व **धृती** म्हणजे हरएक कामांत धैर्य असणें; व **दक्षता** म्हणजे हरएक काम बिनचूक करणें; व **अ पलायन** म्हणजे युद्धांत कधींच पळणें नाहीं. व **दान** म्हणजे जगाला सौख्य देण्या विषयीं अनेक कामें करणारा; व **ईश्वरभाव** म्हणजे ईश्वरी नियमाच्या रीतीनें लोकांस नियम बांधून देवून त्या प्रमाणें सर्वांस वर्तविणें; या प्रकारचीं सहज स्वाभावीक सात कर्मे बाहेर असून, अथवा त्यांचा अंकूर असून ब्राम्हणाचीं जीं उत्तम लक्षणें तीं अंतर्यामीं भावनेंत जो ठेवितो तोच क्षत्रिय आहे. अशा प्रकारचे जीतके मनुष्य या भूमंडळावर असतील, त्या सवाचा एकच क्षत्रिय वर्ग म्हणजे वर्ण आहे व त्यांना वेद शिकण्याचा अधिकार आहे. परंतु शिकविण्याचा अधिकार नाहीं. आतां वैश्याचीं सहज स्वाभावीक कर्मे हीं कीं, **कृषी** म्हणजे पृथ्वींतून हरएक पदार्थांची व धान्यादिकांची उत्पत्ती करावी अशी मेधा फार असणें व **गोरक्ष्य** म्हणजे पुष्कळ जनावरांचें पोषण करावें व धंदारोजगारांत त्यांज पासून कामें करवावीं, अशी मेधा अतिशय असणें; व **वाणिज्य** म्हणजे सकल द्वीपें व खंडें फिरावीं आणि व्यवसाय करावा, व मालाचा क्रय [ बदला मोल देऊन माल घेणें ] विक्रय ( पैसा- घेऊन बदला माल देणें ) अशी मेधा अतिशय असणें; हीं तीन कर्मे जो जगाच्या हिताचें चिंतन धरून करितो तो वैश्य समजावा. व अशा प्रकारच्या मनुष्यांचा जो वर्ग म्हणजे वर्ण त्यालाच वैश्य वर्ण म्हणावें. या वैश्य वर्णाला वेद शिकण्याचा अधिकार आहे परंतु शिकविण्याचा नाहीं. व या वैश्यवर्गाची सहज स्वाभावीक वर सांगीतलेलीं तीन कर्मे असून अथवा त्यांचा अंकूर असून त्याच्या अंतरांत क्षत्रिय व ब्राम्हण यांच्या कर्माची भावना असणें तोच वैश्य आहे.

आतां ब्राह्मण, अथवा क्षत्रिय अथवा वैश्य ह्या तिघांच्या संततीचे असून जे ब्राम्हण व क्षत्रिय व वैश्य ह्या तीन्ही वर्गांत म्हणजे वर्णांत मिळविण्या योग्य असे गुण कर्मा धरून ठरत नाहींत. व त्यांना शिकविलेलेही बरोबर समजत नाहीं तसल्या मनुष्यांचा जो एक वर्ग बांधणें त्या वर्गाला म्हणजे वर्णाला शूद्र वर्ण म्हणावें. असा शूद्र वर्ण या जगांत थोड्या संख्येचा आहे. व वैश्य व क्षत्रिय हे गुणकर्मा प्रमाणें दोनवर्णच पुष्कळ

मनुष्यांच्या संख्येचे आहेत, व यांना वेद शिकण्याचा अधिकार आहे परंतु शिकविण्याचा अधिकार नाहीं. व गुणकर्मा प्रमाणें सांगितलेला जो ब्राम्हण वर्ग म्हणजे वर्ण त्याला वेद शिकण्याचा व शिकविण्याचा अधिकार आहे असी वेद शिकणारांच्या व शिकून शिकविणारांच्या वर्गांची व्यवस्था आहे. या व्यवस्थे प्रमाणें वागलें तर जगाची स्थिति नीट असते व ही व्यवस्था सोडून वर्तूं लागलें म्हणजे जगांत अनेक मतें उत्पन्न होऊन वेद प्रतिपाद्य धर्म कळेनासा होतो. यास्तव ही वर्ण व्यवस्थेची चालना करण्याची एक जागा जशा प्राचीन काळीं असत तसी असावी आणि जों पर्यंत अशी वर्णव्यवस्था प्रथम केल्या प्रमाणें पुन्हा होणार नाहीं तोंपर्यंत आईबापांचा जो वर्ण तोच मुलांचा वर्ण ओळखावा आणि त्याप्रमाणें आचरण करावें.

## भगवद्गीतेंतील वर्ण व्यवस्थेस प्रमाण.

गीता अध्याय ४ श्लोक १३

चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्म विभागशः ।
तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययं १३

[ अर्थ.—चार वर्णांचें प्रमाण गुण आणि कर्मे यांच्या विभागा करून मी रचिलें त्याचा कर्ता मला समज आणि अकर्ता ही मी अव्यय जो त्यासच समज. ]

गीता अध्याय १८ श्लोक. ४२.

शमोदमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेवच ।
ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्म कर्म स्वभावजं

[ अर्थ.—वरतें ब्राम्हणांच्या लक्षणांत पहा. ]

शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धेचाप्यपलायनं ।
दानमीश्वर भावश्च क्षात्रंकर्म स्वभावजं ४३

[ अर्थ.—वरतें क्षत्रियांच्या लक्षणांत पहा. ]

कृषि गोरक्ष्य वाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजं ४४
[ अर्थ—वरतें, वैश्यांच्या लक्षणांत पहा. ]

**परिचर्यात्मकं कर्म शुद्रस्यापि स्वभावजं ४४**

[ अर्थ–वरतें शूद्रांच्या लक्षणांत पहा. त्याणे तीनही वर्णांची सेवा करावी. ] गीता अ० ३ श्लोक ३५.

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ३५**

[ **अर्थ.**–आपला धर्म वाईट जरीं वाटेल तरी त्याच्या अनुष्ठाना पासून परधर्माच्या अनुष्ठानाहून पुण्य आहे स्वधर्मात मरण झालें तरी पुण्य होतें. पराचा धर्म आचरला असतां पातकांची भीति आहे. आतां विष्णुबावा कृत अर्थ ] **श्रेयान्स्वधर्मः याचा** अर्थ जो वर्णव्यवस्थेनें वेदोक्त धर्म स्ववर्ण विभागानें आला. तोच आचरण केल्यानें तरणोपाय आहे. अन्य वर्णाचा वेदोक्त धर्मातील क्रियामार्ग अन्यवर्णास श्रमदायक होऊन पतनासु कारण होयील. गीता अ० १८ श्लोक ४६

**यतःप्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदंततं ।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः**

( **अर्थ**– ज्याणें सर्व इदंततं " आब्रम्हस्तंबपर्यंत ' म्हणजे ब्रम्हा पासून लहानांत अणुरेणु पावेतों भूतांची उत्पत्ती आणि स्थिति आदिपासून केली. आणि त्या सर्वांस व्यापून आहे त्याला स्वकर्मानें अर्चुन. तृप्त करील तो मनुष्य सिद्धि म्हणजे मोक्ष पावेल. आतां विष्णुबावा कृत ) अर्थ आपल्या आपल्या गुणकर्म विभागाचा जो वर्ण त्याला वेदोक्त जी कर्में सांगितलीं आहेत तीं ईश्वरावर लक्ष देऊन केलीं असतां ईश्वराचा सन्मान केल्याचा लाभ आहे. व स्मृति

**जन्मना जायते शुद्रः संस्काराद्विज उच्यते**
**वेदाध्ययनतो विप्रो ब्रह्मजानाति ब्राह्मणः**

अर्थ–संस्कारानें द्विज होऊन वेदाध्ययनानें विप्र ठरून. जो ब्रह्मज्ञानी तो. ब्राम्हण-वर्ण व वर्ण व संस्कार व वेदाध्ययन या तीही विरहित असून जो ब्राम्हज्ञानी झाला त्याला ब्राम्हण नम्हणतां त्याला गीता अ० ९ श्लोक ३०

**[ अपिचेत्सु दुराचारो भजते मामनन्य भाक् ।**
**साधुरेव स मतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ३०**

**अर्थ.**-जरीही मोठा दुराचारी तरीं मला अनन्य भावानें भजतो तो साधूच असें मानावें. तो " **सम्यग्** " म्हणजे जसा मला आवडतो तसा " **व्यवसितो** " व्यवसाय करीत आहे. आतां बिष्णूबावा कृत संक्षिप्त अर्थ. ] श्लोक ३० प्रमाणें म्हणजे " **साधुरेव स मंतव्यः** ' प्रमाणें साधु मानावा [ यांत ब्रम्हचारी बावांनी " **एव** " या शब्दांच्या अर्थावर वजन दिलें नाहीं त्याणें थोडें उणें दिसते. ) व यजुर्वेदामध्यें हिरण्यकेशी शाखेच्या संहितेच्या पांचव्या अष्टकाचे दुसऱ्या अध्यायाचे सातव्या अनुवाकांत ब्राम्हण मुख्य श्रेष्ठ कां या विषयीं प्रमाण. श्रुती. " **ब्रह्म जिज्ञानमित्याह तस्माद्ब्राह्मणो मुख्यो मुख्यो भवति य एवं वेद ब्रम्हवादिनो वदंति** ' असें आहे श्रीमद्भागवत एकादश स्कंध अध्याय १७ श्लोक ९ नऊ पासून चवदा पर्यंत वर्ण व्यवस्था आहे. [ ह्यांत १३ वा श्लोक

**विप्र क्षत्रिय विट् शूद्रा मुख बाहूरु पादजाः ।**
**वैराजात्पुरुषाज्जाता य आत्माचार लक्षणाः १३**

**अर्थ.**-विराठरुपी पुरुषा निमित्य आपल्या आचार आणि लक्षणांनी जे जसे झाले तसे व्रिप्र मुखा, क्षत्रिय बाहू, वैश्य ऊरु, शूद्र पादा. निमित्य झाले. हा पंचमीचा अर्थ निमित्य आणि चतुर्थीचा आर्थ करितां हे समतोल होतात. या शिवाय या पुढील १९ पासून २१ पावेतों श्लोक पाहिले ह्मणजे अगदीं मिळतें होतें ) व पुरुष सूक्ताचे बारावे ऋचेंत वर्ण व्यवस्था आहे. परंतु एकवाक्यानें अर्थ समजला पाहिजे. .... .... .... ....

२३ **प्रश्न.**-वर्ण व्यवस्थेवरून तीन वर्णांतील सकल मनुष्यांना वेद शिकण्याचा अधिकार आहे परंतु वेद शिकून शिकविण्याचा अधिकार फक्त ब्राह्मणालाच आहे याचें कारण काय.

२४ **उत्तर**-एकंदर भूगोलावरील मनुष्यांचे गीता अध्याय ४ श्लोक १३ प्रमाणें ह्मणजे ( श्लोक आणि त्याचा अर्थ वरतें २२ वे अंका पुढें उत्तर लिहिलें आहे तेथें पहा ) या प्रमाणें वर्ण समजावे. त्यांतून ब्राम्हण क्षत्रिय वैश्य हे तीन वर्ण वेद शिकण्यास अधिकारी आहेत. परंतु वेद शिकून शिकविण्यास अधिकारी ब्राम्हण वर्ण मात्र आहे. कारण गुणकर्म विभागानें वेद शिकविण्याच्या कामाची योग्यतः ब्राह्मण जो त्यालाच आहे. क्षत्रिय व वैश्य यांस नाहीं. याचें कारण त्यांचीं गुणकर्में गुरुत्वाची पदवी देण्यांस योग्य नाहींत व त्यांना गुरुपद वेद शिकविण्याचें दिलें तर, ते हुकूम चालऊन मतवादी होतील. [ खरोखर च सांप्रत ब्राम्हण म्हणविणार बहुतेक असे मतवादी झाले आहेत. ] यामुळें क्षत्रिय व वैश्य

याहीं [ वरील वर्ण व्यवस्थेचीं लक्षणें पहा ] तरणोपाया पुरतें वेदाध्ययन करावें. दुसऱ्यास शिकविण्याकरितां सकल वेद घोकण्याची त्यांना गरज नाहीं. तें काम गुणकर्म विभागानें जे ब्राम्हण [ वर्णांतला कोणीही ] त्यांनी करावें. वेदार्थ समजण्यां करितां वेद व शास्त्र या दोहींचे अध्ययन बरोबर [ चांगलें अथवा सह ] करावें. व शूद्र म्हणजे तीन्ही वर्णाचीं गुणकर्में ज्या मनुष्यांत नसतात ते मूढ स्वत: ज्ञान [ व्यवहारादीकांत लोकांस बुडवुन आपला नफा करून घेणें हें ज्ञान नव्हे. वैदीकज्ञान. ] नसून सांगून ही समजत नाहींत, असे जे **तीनहीवर्णाच्या संततात उत्पन्न होतात त्यांचा जो बांधिलेला वर्ग त्याला शूद्र म्हणावें** ही वर्ण व्यवस्था करून ठेविली आहे या प्रमाणें वागावें. व शूद्राला नेहमीं गोष्टी शिकून न ईश्वर भक्तीस लावावा. या प्रमाणें च स्त्रियांची व्यवस्था करावी म्हणजे सर्व प्राणी तरतात.

क्षत्रियांही षट्कर्मे चालऊन अग्निहोत्र ठेविल्यावरून ब्राम्हणांस वाईट वाटूं लागलें तेव्हां मुंबईचे गवरनर यांजकडे नीलकंठशास्त्री थथे आदिकरून पुणेकर व वाईकर ब्राम्हण संख्या २३०० याहीं तारीख सात ७ अकटंबर सन १८३१ इसवी रोजीं अर्ज केला आहे त्यांत छत्रपती महाराज ( प्रतापसिंव्ह उर्फ बुवा साहेब ) आपल्यावर जुलूम करितात. वाईकर शिष्ट थोर ब्राह्मण यांचे पायांत बिड्या घातल्या आहेत. यांत मुख्य कारण परभू याहीं कुंड करून **अग्निहोत्र घेतलें आहे.** हें त्यांस अधिकार नसून केल्यानें आमचा धर्म बुडतो म्हणून आम्ही मनाई करितों हें आहें याचीच चौकशी करावी आणि **अग्निहोत्र बंद करावें** असें लिहिलें आहे. त्या अर्जीवरून गव्हरनर साहेब यांणी बांर्डिन साहेब डिपुटी यजंट यांस चीफ सेक्रेटरी चार्लिस नारीस यांच्या सहीनिसी तारीख २७ अकटंबर सन १८३१ इसवीचें पत्र लिहिलें त्यांतील तात्पर्य आह्मी यांत हात घालीत नाहीं. त्यावरून बांर्डिन साहेब डिपुटी यजंट यांचे असिस्टेंट सातारा येथें असणार यांणी तारीख ९ डिसेंबर सन १८३१ ची यादी महाराजांस नंबर १३९ ची लिहून ब्राह्मणांच्या अर्जीची नकल किंवा तर्जुमा पाठविला आहे. त्याजवरून महाराजांनी नंबर १०८ तारीख १९ डिसेंबर सन १८३१ ची यादी लिहिली.

ह्या सर्व लेखांत अग्नि कुंडासंबंधी मजकूर आहे. सन १८३१ ह्मणजे शके १७-९३ आहे.

हे लेख धारेस माझे मावसबंधू बाळाजी देवराव शृंगारपुरे यांचे घरीं निघाले या वरून

बळवंतराव मल्हार चिटनवीस यानी स्मार्ताग्नि सिद्ध करून अग्न होत्र टेविलें होतें हें खरें आहे. ह्या सर्वांच्या नकला धारेस व मजपासीं आहेत.

स्मृतीचा अर्थ ब्राम्हण मात्र षट्कर्मांचे अधिकारी द्विज आणि विप्र हे अधिकारी नाहीत असें असतां जे ब्राम्हण होते त्यां पासून उत्पन्न झाले ते वंश परंपरेनें ब्राह्मण ह्मणवितात जसे एकदां पूर्वजानें दिक्षा घेऊन यज्ञ केला ह्मणजे त्याचे वंशजांचें ही दिक्षित असें नाव चालतें परंतु दिक्षेचा अभावच. तसें ब्राह्मण ह्मणविणारें लोकांस तीन कर्माचाच अधिकार आहे साहांचा नाहीं ह्या अर्था प्रमाणें वर्तन ही होत आहे. ब्राह्मण संतर्पण ह्मणतात त्यांत ब्राह्मण ( ब्रह्मीं निष्ठा ठेऊन वागणार शम दमादि गुणानें युक्त ) आणि द्विज [ जरीं वेदाधिकारी आहे तरीं उपजीविकेस अन्य धर्मास योग्य असा लेखन, वाणिज्य, कृषी, आदिकरून उद्योग करणारा ] असे भोजनास असतात त्यांत दक्षिणा घेण्याची वेळ आली म्हणजे द्विज ( गृहस्थ ) ह्मणविणारे जे असतात ते दक्षिणा घेत नाहीत. हें करणें स्मृत्यर्थानें बरोबर आहे.

आग्रही लोक समजतील कीं ते सधन असल्यामुळें असें करितात परंतु असें समजणें निराधार आहे. स्मृत्यर्थानें त्यांस अधिकार नाहीं म्हणूनच हा रूढाचार आहे. तसेच ते लोकांकरितां वरणी घेऊन काम करीत नाहींत. आणि शाळा ठेवून विद्यार्थ्यांस शिकवीत ही नाहींत. हें त्यांस व्यवसायामुळें अवकाश नाहीं ह्मणून ते करितात व्यवसाय नसेल तव्हां त्याणीं हीं वर्जकर्मे करावीं असेंच जर मानलें तर क्षत्रियादिकांस व्यवसाय नसला ह्मणजे त्यांस षट् कर्माधिकार आहेच असेंही मान्य केलेंच पाहिजे. हीं तीनही वर्ज कर्मे चांद्रसेनीयांहीं केलीं होतीं यास आधार शके १७९२–९३ सालांत बळवंतराव मल्हार चिटनविस याहीं विठ्ठलराव देवाजी यांस पत्र लिहिलें त्यांतील उतारा. " आपण ब्राह्मणाहीं कर्म करूं नये व करूं देवू नये पैकीं करूं देऊ नये हा समय ब्राह्मणांचा नाहीं आतां करूं नये हा नेम ब्राम्हणाहीं केल्यामुळें आह्मी आपले ज्ञातीचे षोडंश संस्कार वेदोक्त चालविण्यास गृहस्थ तय्यार विद्या शिकवून केलें होतेच त्याजवरून सरकार स्वारी माहुलीस जावून हजारो ब्राह्मण उभय क्षेत्रस्थ यांचे समक्ष संकल्प आदि कर्म आमची ज्ञात अस्खलित चालली दक्षिणा घेवून गंगेत विसर्जन होते हे सर्व आडत नाहीत कर्मे चाललीं असें पाहून त्यामुळें ब्राह्मणांहीं नहाचें बोलणें चालविलें आहे. " स्मार्ताग्नि सिद्ध केल्याचा ही मजकूर ह्याच पत्रांत आहे. व त्याची नकल मजपासीं आहे.

श्री विश्वनाथ नामा या कायस्थान्वयीं प्रभू वर हो ।
तद्दिनतः प्रभु आख्या झालीसे प्रकट ही प्र भूवर हो. १०३

या कायस्था ( चांद्रसेनी ) च्या वंशांत विश्वनाथ नावाचा पृथ्वी पालन करणारा श्रेष्ठ राजा झाला ( हेमाद्रि प्रबंध अध्याय २४ उत्तरार्ध पहा दाल्भ्यऋषीनें परशुरामाचा गुरु शंकर यास प्रार्थून श्लोक ७१–७२–७३

ततो दाल्भ्येन महता तपसाराधितो हरः ।
हरं संप्रार्थयामास बालः कायस्थ संमतः ७१

अस्य कीर्तिर्यथालोके भविष्यति तथा कुरु.

अर्थः—मग महाऋषि दाल्भ्यानें तपेंकरून शिव आराधून प्रार्थून कायस्थ बाल ज्याला मान्य मानिला आहे असा ( भेटविला आणि ) याची कीर्ति जेणेंकरून लोकांतें होयील तसें कर ( असें शंकरास विनविलें. तें शंकरानी मान्य करून बोलतात. )

हर उवाच. शृणु दाल्भ्य प्रवक्ष्यामि कायस्थ इति नामतः ७२

देवेष्वपि वरीवर्ति संबंधस्तेन तस्यच ।
करिष्यामि यथा लोके कीर्तिमान्बालको भवेत्. ७३

अर्थः—ऐक दाल्भ्यऋषे मी सांगतों. कायस्थ नावानें किंवा नावापासून त्या संबंधानें देवांतही वर्चस्व ठेऊन वर्तणारा कीर्तिमान बालक होईल तसा करीन. या श्री शिवाच्या कृत्यानें तो [ चंद्रसेनाचा पुत्र राजा झाला त्याजला चित्रगुप्ताच्या कन्येच्या उदरीं च्यार पुत्र. विश्वनाथ. १ महादेव. २ भानु. ३ लक्ष्मीधर. ४ झाले त्यांतील ] विश्वनाथ प्रजा पालन करूं लागला. तेव्हां पासून प्रभु असें नांव चाललें. श्रोते प्रभु श्रेष्ठहो असें तुम्हांस प्रभु. हें सामान्य नाम प्राप्त झालें तेंच आतां प्रकठ आहे.

ब्रह्म क्षत्रिय वैश्य शूद्र असे चारवर्ण मुख्य गुणें ।
कर्मी पूर्ण असति परि शूद्रीं राहें द्विजत्व साग्र उणें

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चारवर्ण गुणानें मुख्य आहेत. कर्मांत पूर्ण परंतु शूद्राचे विषयीं द्विजत्व मात्र उणें आहे. १०४ वरील रचनेस आधार ग्रंथ जो तो.

# श्री स्कंद पुराण रेणुका महात्म्य अंध्याय ४७

श्री राम उवाच. ब्रम्हघ्न पश्यचांडाल यत्वया नपराधिनं ।
हतं मत्पितरं दुष्ट तस्यैदं कर्मणः फलं. ८

परशुराम बोलला. दुष्टा, चांडाला. ब्राम्हण मारणाऱ्या तूं माझाबाप अपराधी नाहीं त्यास मारिल्या कर्माचें फळ हें जें तें पहा. ८

इत्युत्का हृदयं तस्य रामः सत्यपराक्रमः ।
पश्यतां सर्व देवानां तत्पफाल नखांकुरैः ९

असें बोलून सत्यपराक्रमी रामानें सर्व देव पाहात असतां नखांचे शेंड्यांनी तें त्या [ सहस्त्रार्जुना ] चें हृदय फाडलें. ९

ततः परशुरामेण मथितंहृदयं नखैः ।
तस्य पीयुष संसृष्ट्वा सुस्राव रुधिरं बहु १०

मग परशुरामानें अमृतमय रचिलेलें त्याचें हृदय नखांनीं फोडिलेलें पुष्कल रक्ताचा स्राव करितें झालें. १०

सछिन्नहृदंयः संख्ये छिन्न बाहू मुनीश्वराः ।
सायुज्यमगमव्दाणैरर्जुनस्त्यक्त जीवितः ११

हे मुनीश्वरहो तो [ सहस्त्रार्जुन ] युद्धांत बाणांनी हृदय आणि बाहू छेदिलेला जीवित टाकिलेला सायुज्य गतीस [ पदास ] गेला. ११

हत्वा परशुरामस्तु कार्तवीर्यं रणे रिपुं ।
करानुत्पाठ्य तं भादात्पित्रे तद्रुधिरांजलिः १२

कार्तवीर्य शत्रूला रणांत मारून त्याचे हात उपडून त्याच्या रक्ताची अंजली राम आपल्या बापाला देता झाला. १२

स्कंद उवाच. एवं हत्वार्जुनं रामो संधाय निशितान् शरान् ।
अन्वधावत्सतान्हंतुं सर्वानेवासुरान्वयान् १३

स्कंद म्हणतो असा अर्जुनाला मारून तो राम धारा काढिलेले बाण [ धनुष्यास ]

लाऊन असुरांचे वंश असे जे [ दैवी संपत्ती जांत नाहीं ते असुर संपत्तीचे, क्षत्रियांचे वंश ] सारे त्यांस मारण्यास त्यां मागून धांवला. १३

केचिद्गगनमाश्रित्य केचित् पातालमाविशत् ।
जरां कृत्वा त्मनः केचिद्ब्राम्हवेशमधारयन् १४

कांहीं जण गगनाचा आश्रय करून राहिले कांहीं पातालांत शिरते झाले कांहीं ब्राम्हणाचा वेश धरून काहीं म्हाताऱ्याचे वेश आपल्यास घेऊन ( करून ) राहते झाले. १४ १५।१६।१७।१८ सोडिले.

केचिद्वै तालिकाः शुराः राजानस्तद्भयार्दिताः ।
सगर्भा चंद्रसेनस्य भार्या दाल्भ्या श्रमं गता १९

काहीं राजे रामाच्या भयानें दुःखित होत्साते तालिक ( टाळ्या वाजऊन गाणारे ) झाले चंद्रसेनाची स्त्री गर्भवती होती ती दाल्भ्याच्या आश्रमास गेली. १९

सुमंतुस्य च या कन्या चंद्रसेनस्य दत्तवान् ।
तस्याः शापमभूद्राजन् दुर्वासाच ऋषेस्ततः २०

सुमंतु राजर्षीची कन्या हीला दुर्वासा ऋषीचा शाप झाल्यानंतर सुमंतु राजा सून चंद्रसेनास देता झाला असी जीती. २०

ततो रामः समायातो दाल्भ्या श्रममनुत्तमं ।
पूजितो मुनिना रामोऽर्घ्यपाद्यासनादिभिः २१

नंतर राम त्या अतिउत्तम दाल्भ्याश्रमास आला. त्या मुनीनें अर्घ्य पाद्य आसन आदिकरून राम पुजिला,

अथ मध्यान्ह समये तस्मै भोजनमादरात् ।
ददौ दाल्भ्यो मुनिः श्रेष्ठो भार्गवाय महात्मने २२

तेव्हां मध्यान्ह वेळीं आदरेंकरून भार्गवरामास दाल्भ्यमुनीनें भोजन दिलें [ वाढून आणिलें किंवा घातलें. ] २२

भोजनावसरे तत्र गृहीत्वापोशनं करे ।
रामस्तु याचयामास हृदिस्थं स्व मनोरथं. २३

तेथें भोजनाच्या वेळेस आपोअशन हातांत घेऊन आपल्या हृदयां [ मनां ] तील मनोरथ परशुराम मागूं लागला. २३

**तस्मै प्रादादृषिः कामं भार्गवाय महात्मने ।**
**याचयामास रामाद्वै कामं दाल्भ्यो महामुनिः २४**

महात्मा भार्गवरामयाकारणें इच्छिलें देऊंकरून आपण [ दाल्भ्य ] रामा पासून आपल्यास मिळणें तें मागुन २४

**ततो द्वौ परमप्रीतौ भोजनं चक्रतुर्मुदा ।**
**भोजनांते महाभागावासने उपविश्य च. २५**

मग दोघे ही परम प्रीतीनें युक्त झालेले भोजन करिते झालें हर्षाने भोजन झाल्यावर दोघेही भाग्यवंत आसनावर बसून पुढें. २५

**तांबूलानंतरं दाल्भ्यो पपृच्छ भार्गवं प्रति ।**
**यत्त्वया प्रार्थितं देव तत्त्वं शंसितुमर्हसि. २६**

तांबूल ( विडे ) घेतल्यावर दाल्भ्य भार्गवास विचारिता झाला कीं तुझें मागितलेलें तें तूं सांगण्यास योग्य आहेस. २६

**श्री राम उवाच. तवाश्रमे महाभाग सगर्भा स्त्री समागता ।**
**चंद्रसेनस्य राजर्षेः क्षत्रियस्य महात्मनः २७**

राम म्हणाला महा भाग्यवंता महात्मा जो चंद्रसेन राजऋषि त्याची स्त्री गर्भासहित तुझ्या आश्रमास आली आहे. २७

**तन्मेत्वं प्रार्थितं देही स्त्री सगर्भा महामुने ।**
**ततोदाल्भ्य प्रत्युवाच ददामि तव वांच्छितं. २८**

हे महामुने मी तुला मागितलें तें [ हें आहे. ] सगर्भा स्त्री जी आहे ती मला दे. मग दाल्भ्य म्हणाले तुझें इच्छिलेलें मी देतों. २८

**यन्मया प्रार्थितं देव तन्मे दातुं त्वमर्हसि ।**
**ततः स्त्रियं समाहूय चंद्रसेनस्य वै मुनिः २९**

मी जें तुला मागितलें तें देण्यास तूं योग्य आहेस. मग मुनीनें चंद्रसेनाचे स्त्रियेस बोलाऊन. ये. म्हणतां च. २९

**भीता सा चपलापांगी कंपमाना समागता ।**
**रामाय प्रददौ तत्र रामः प्रीतमना अभूत. ३०**

ती चपल आपांगी [ डोळ्यांच्या पापण्या खालचीं अपांगें भयानें त्वकर त्वतात हालतात जीचीं असी ] भय पावलेली कांपत कांपत आली. ती ऋषीनें रामास दिली राम संतोषास पावला. ३०

**यत्त्वया प्रार्थितं विप्र भोजनावसरे पुरा ।**
**तन्मे शंस महाभाग ददामि तव वांछितं ३१**

हे विप्रा पूर्वी भोजनाच्या वेळेस तूं जें मागितलेंस तें महाभाग्यवंता मला सांग तें तुझें इच्छिलेलें मी देयीन. ३१

दाल्भ्य उवाच. **प्रार्थितं यन्मया पुर्वं रामदेव जगद्गुरो ।**
**स्त्रीगर्भस्थममुं बालं तन्मे दातुंत्वमर्हसि ३२**

दाल्भ्य म्हणतात. हे जगद्गुरो रामा मी जें पूर्वी मागितलें तें. स्त्रीच्या गर्भातलें बालं तें मला देण्यास तूं योग्य[समर्थ ] आहेस. ३२

**ततो दाल्भ्यं ब्रवीद्रामो यदर्थमिहमागतः ।**
**क्षत्रियांत करश्चाहं तत्त्वं याचितवानसि. ३३**

मग दाल्भ्यास राम म्हणतात मी क्षत्रियांचा अंतकरणारा ज्या करितां येथें आलों तें च तूं मागता झाला आहेस ३३

**प्रार्थितंच त्वया विप्र कायस्थं गर्भमुत्तमं ।**
**तस्मात्कायस्थ इत्याख्या भविष्यति शुशोः शुभे ३४**

हे विप्रा [ वेदपाठ कर्त्या ] शरीरांत असलेल्या उत्तम गर्भाला तूं मागितलास म्हणून हें उत्तम [ शुभ ] बालक यास कायस्थ ( शरीरांत किंवा देहांत राहिलेला ) असें नाव होईल. ३४

**जायमानो यदा बालो क्षात्रधर्मा भविष्यति ।**
**दुष्टाद्वै क्षात्र धर्माचु वारितुंच त्वमर्हसि. ३५**

उत्पन्न होणारा बाल जेव्हां क्षत्रधर्म [ क्षत्रियांचा धर्म ] चालविता होईल तेव्हां

दुष्ट क्षत्रियधर्म ( सुष्ट म्हणजे चांगले. जीव किंवा ज्यांपासून दुसऱ्यांस त्रास—नाहींत त-ह्यांस मारणें अन्याया वाचून दंड करणें ) या पासून वारण्यास तूं योग्य आहेस. येथें दुष्ट शब्द घेतला असून प्रथम क्षत्रियांचा धर्म चालविता होईल असें सांगीतलें तो [ धनुष्य धा-रण करणें प्रजांचें पालन करणें. दुष्टांचें दमन करणें ) हा धर्म होय. त्यापासून वार असें सांगितले नाहीं, ३५

**ततो दाल्भ्यः प्रत्युवाच भार्गवंप्रति हर्षितः ।**
**माकुरुष्वात्र संदेहं दुर्बुद्धिर्न भविष्यति. ३६**

मग दाल्भ्यऋषी हर्षयुक्त झालेले रामास बोलले हा संदेह तूं करूं नको. हा बाल दुर्बुद्धि होणार नाहीं. ३६

**एवं रामो महाबाहुर्हत्वा तंगर्भमुत्तमं ।**
**निर्जगामाश्रमात्तस्मात्क्षत्रियांतकरः प्रभुः ३७**

असा राम महाबाहू [ परांचें आक्रमण म्हणजे शत्रूजनांस आपल्या सत्तेंत आणणें हें करण्यास ज्याचे हात समर्थ आहेत असा ] त्या उत्तम गर्भास सोडून क्षत्रियांचा अंत कर-णारा प्रभु म्हणजे अधिकाराने मोठा त्या दाल्भ्यऋषीच्या आश्रमा पासून निघून जाता झाला. येथून तीन श्लोक क्षत्रिय मारण्याच्या प्रकाराचेंच आहेत ते. ३८।३९।४०

**एकाकी निर्भयो रामो घातयन्नृपतीं तदा ।**
**महीं बभ्राम तान्प्रेक्षन्कल्पांताग्निसम प्रभः ४१**

तेव्हां एकटा राम निर्भय कल्पांत अग्निसारखा पृथ्वी फिरून त्या राजाना पाहून मारित राहिला. ४१

४२ वा एक श्लोक सोडिला.

**पुत्रान्पौत्रांस्तथा बंधून् पितृन्ज्ञातींन्सखीन्स्तथा ।**
**घातयामास तान्रामो स्त्रीणांगर्भेषु संस्थितान् ४३**

पुत्र पौत्र तसेच भाऊ बाप कुटुंबांतील मित्र आणि स्त्रियांच्या उदरांतील गर्भ यांस मारून.किंवा मारिता होऊन, बहूत शोध करितां मिळालेल्या प्रतींत दोन श्लोक अधिक आहेत, ते पुढें तीसरे अध्यायांत शंकराचार्यांच्या निबाड्यांत हाच कथाभाग लिहिला

आहे. त्यांत लिहिले आहेत. त्यांचें अर्थ तात्पर्य. चंद्रसेनाच्या स्त्रीच्यागर्भात काय झालें आणि त्याचा धर्म, कर्म, संस्कार यां विषयीं अधिकार कसा झाला तें सर्व सांग. असा प्रश्न सनत्कुमारादि ऋषींनीं षडाननास केला हें आहे. त्यावरून स्कंदांनीं सांगितलें.

**कायस्थ एष उत्पन्नो क्षत्रिण्यां क्षत्रियात्ततः ।**
**रामाज्ञया स दाल्भ्येन क्षात्रधर्माद्बहिष्कृतः ४४**

मग क्षत्रियापासून क्षत्रिणीच्या पोटीं हा कायस्थ उत्पन्न झाला तो रामाच्या आज्ञेवरून दाल्भ्यानें क्षात्रधर्मा बाहेर केला. ह्या श्लोकांत असलेल्या अक्षरांचा अर्थ हा लिहिला आहे. परंतु रामाच्या आज्ञेचा वरतें ३९ सावा श्लोक आहे त्यावरून पाहिलें तर दुष्ट **धर्माद्बहिष्कृतः अर्थ दुष्ट धर्मापासून बाहेर केला असा घेतला पाहिजे.** कदाचित् क्षात्र असेंच घेतलें तर दुष्टक्षात्र असेंच ह्मटलें पाहिजे.

**दत्त कायस्थ धर्मोस्मै चित्रगुप्तस्ययः स्मृतः ।**
**प्राप्त कायस्थ नामत्वाल्लेख्या वृत्तिश्च भूभृता. ४५**

त्यास चित्रगुप्त कायस्थाचा धर्म जो म्हटला आहे तो दिला. कायस्थ नाम पावला ह्मणून राजांपाशीं लेखन करणें हें उपजीवीकेचें साधन ( वृत्ती ) झालें आहे. ४५. ९५ आर्येचा अर्थ पहा.

**तस्य भार्याकृता चित्रगुप्त कायस्थ वंशजा ।**
**तद्वंशजाश्च कायस्थाः दाल्भ्यगोत्रास्ततोभवन्. ४६**

चित्रगुप्त कायस्थांच्या वंशजाची कन्या किंवा वंशजाच्या कन्या त्या चंद्रसेन पुत्र चांद्रसेनी सोमराज, यास दिल्या मग तेव्हां पासून त्याचें वंशज दाल्भ्य गोत्री झाले. ४६

**दाल्भ्योपदेशतस्तेवै धर्मिष्ठाः सत्यवादिनः ।**
**सदाचार रता नित्यं रता हरि हरार्चने. ४७**

दाल्भ्याच्या उपदेशानें धर्मिष्ट धर्मच ज्यांनां इस्ट ( चांगला वाटतो ) सत्यवादी [ खरें बोलणारे ] सदाचार [ सत् ह्मणजे वेद शास्त्राच्या प्रमाणानें वर्तणार असे मुनि जे त्यांचा आचार ) त्यास रत ( आवडी धरून राहणारे ) नित्य. [ अखंड ] हरि [ विष्णु ] हर [ शिव ] अर्चनांत रत राहिले. .... .... .... — ४७

देव विप्र पितृणां वै अतिथी नांच पूजकः ।
यज्ञ दान तपः शीला व्रत तीर्थ रताः सदा. ४८

देव विप्र [ वेद पाठ असलेले ब्राह्मण ) पितर यांस आणि अतिथींस पूजणारे. यज्ञ [ संध्या पूजा, ब्रह्मयज्ञ, वैश्वदेव अतिथि भोजन, असे अथवा, याज्ञवल्य स्मृति, आचाराध्याय श्लोक १०२ यांत सांगितलेले, भूत, पितर, देव ब्रह्म ( वेद ) आणि मनुष्य असे पंच महायज्ञ ) दान करणें, तप करणें हेंच ज्यांचें दृढ आचरण आहे. व्रतें एकादशी आदिकरून आणि तीर्थें करणें यांत सर्वकाल रत राहिले. ४८

गर्भाधानं पुसवन सीमंतं जातकर्मच ।
नामकार्य निष्क्रमण मन्नप्राशन चौलकं ४९

गर्भाधान १, पुंसवन २, सीमंतोन्नयन ३, जातकर्म ४, नामकर्म ५, निष्क्रमण ६, अन्नप्राशन ७, चौल ८. ४९

मौंजिबंधन दानाय महाव्रत मतः परं ।
उपनिषद्व्रत गोदान समावर्तन नामकं ५०

मौंजिबंधन ९, दानव्रत १०, महाव्रत ११, महानाम्निव्रत १२, उपनिषद्व्रत १३, गोदान व्रत १४ समावर्तन १५.

विवाह पुत्रकामाय संस्काराः षोडशाः स्मृताः ।
क्षत्रियाणामयं धर्मो कृतं मौंजि निबंधनं ५१

पुत्र उत्पन्न करण्या करितां विवाह. १६ चौला पासून समावर्तन पावेतों ब्रह्मचर्यांत होतात. विवाह मात्र गृहस्थाश्रमांत हा करण्याचा हेतू पितरांचे ऋणांतून मुक्त होण्यास पुत्रोत्पत्ती करणें हाच आहे. असे संस्कार करणें हा क्षत्रियांचा धर्म मौंजी बंधन झालें त्याणें करण्याचा. ५१

यत्किंचिद्वैदिकं जाप्य नवग्रह मखादिकं ।
नाना शांतिश्च विधिवदृत्विग्भिरेव कारयेत् ५२

यत्किंचित् [ सर्व वेद याचा वाक्य विस्तार वर १०१।१०२ आर्यांच्या अर्थात दाखविला आहे ] सकल पूर्ण वेद म्हणावे. असे जपकरून नवग्रहादीक यज्ञ करावे. नाना

शांति. विधि सांगितले आहेत तशा ऋत्विजां ( गुरुस्थानीं मानिलेले आचार्य उपाध्याय-यां ] कडून करवाव्या. ९२

श्रीमहाभारत आदिपर्व अध्याय २११ सुंदोपसुंद कथेंत.

त्रिषुलोकेषु यत्किंचिद्भूतं स्थावर जंगमं ।
समानयद्दर्शनीयं तत्तदत्र सविश्ववित् ३

अर्थ–तीनलोक ( भूमि अंतरिक्ष स्वर्ग ) यांचे ठाईं जें कांहीं सर्व स्थिर आणि चर त्या सर्वांस दृश्यमात्रांस तो विश्व जाणता येथें आणिता झाला. ३

वनपर्व अध्याय १६३ धौम्य सांगतात.

यस्मिन्ब्रह्मसदश्चैव भूतात्माचावतिष्ठते ।
प्रजापतिः सृजन्सर्वं यत्किंचिज्जगमागमं १३

या ब्रह्मसभेच्या ठायीं भूतात्मा [ जगदात्मा विष्णु ] राहात आहे आणि प्रजापति ( ब्रह्मदेव ) सर्व यत्किंचित् (जें कांहीं सर्व)स्थावर जंगमयाची उत्पत्ती [रचना] करितो. १३

पाराशर स्मृति अध्याय १

सर्वेधर्माः कृतेजाताः सर्वेनष्टाः कलौयुगे ।
चातुर्वर्ण्य समाचारं किंचित्साधारणं वद १७

सर्व धर्म कृतयुगांत झाले ते सर्व नष्ट झाले आतां कलियुग येणार यांत चारही वर्णाचा आचार सम्यक् [ जसा हवा तसा ] किं [ कांहीं ] चित् ( सर्व ) साधारण ( सर्व व्यापक) तो सांग.

षण्णाच कर्मणा मध्ये त्रीणि कर्माणि जीविकाः ।
चत्वारस्तनयो आसन्सोमराजस्य विश्रुतः ९३

सहा कर्मे त्यांतून तीन कर्मे करून जीविका करितात, सोमराजाला चार पुत्र सर्वांहीं ज्यांची कीर्ति आयिकली असे होते. ९३

विश्वनाथो महादेवो भानुर्लक्ष्मीधरस्ततः ।
संख्यावानप्यसंख्योभूद्विश्वनाथो महाप्रभुः ९४

विश्वनाथ १, महादेव २, भानु ३, लक्ष्मीधर ४, मग असंख्या [ पुष्कळां सीं] संख्या

वान् ( युद्धकरणारा ) किंवा पुष्कळांत नामाधिला असा विश्वनाथ महा प्रभुः ( मोठाराजा ) झाला. ९४

**निवासः श्री सरस्वत्या रूपौदार्य कला श्रयः**
**आचारे व्यवहारे च प्रायश्चित्ते विशेषतः ९९**

श्री लक्ष्मीनें सरस्वतीनें आपलें राहण्याचें स्थानच मानिला. रूप उदारत्व कला यांचा आश्रयच आचार. व्यवहार विशेषें करून प्रायश्चितांत [ स्मृति विषयांत ] ९९

**ज्ञात्वा जाति विवेकं हि द्विजाः सभ्यत्वमर्हति ।**
**ब्रह्म क्षत्रिय विट् शूद्राः वर्णा प्रोक्ता स्वयंभुवा ९६**

ज्ञातीचा विवेक जाणून द्विज आहेत ते सभ्यत्वास योग्य आहेत. ब्रह्मदेवानें किंवा स्वायंभु मनूनें, वेदांत किंवा स्मृतींत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र असे सांगितले आहेत. ९६

**तेषां धर्माः पृथक्प्रोक्तास्त्रयः पूर्वे द्विजातयः ।**
**वर्णेभ्यो ये समुद्भूताः प्रतिलोम्यानुलोमजाः ९७**

त्यांचे धर्म वेगळाले सांगितले आहेत. त्यांत पूर्वीचे तीन द्विज. चारी वर्णांपासून अनुलोमानें [ श्रेष्ट वर्णाच्या पुरुषानें कनिष्ट वर्णाची स्त्री विवाहून झालेली उत्पत्ती) प्रतिलोमानें [ कनिष्ठ वर्णाच्या पुरुषानें श्रेष्ठ वर्णाच्या स्त्रीसीं विवाह नकरितां संतती झालेली ] जे उत्पन्न झाले ते इतर आहेत यांचा विस्तार सह्याद्री खंडांत आणि गागा भट्टीत आहे. ९७'
जातीभेद विवेक सार " हा ग्रंथ एका हिंदूनें केला. ( ह्याणें आपले नांव, जात, दाखविली नाहीं. ) हा वि० रा० जोतीबा गोविंदराव फुले पुणेकर ह्यांनीं सन १८६९ इसवींत छापिला त्याविषयींचा मुख्य हेतू कळविलेला, श्लोक

**ज्ञानमेवाश्रयेद्विद्वान्जाति दोष विनाशयत ।**
**जाति दुःख विनाशेन सर्वदुःख विनाशनं ७९**

पद्मपुराण सह्याद्री खंड अध्याय् ४ ह्या ग्रंथाच्या ४८ व्या पत्रावर स्कंद पुराणांतील इतिहास संक्षित आहे. त्यास आधार शुद्र कमलाकराचा घेऊन कायस्थ उत्पत्ती दाखविली आहे. परंतु त्यांत गैरसमजूत आहे.

शूद्र कमलाकरकारानी त्रिविध कायस्थांची उत्पत्ती. पद्म पुराणांत चित्रगुप्त, १ स्कंद पुराणांत चांद्रसेनीय २ आणि त्या पुढें संकरज ३ असे कायस्थ त्रय यांची उत्पत्ती दाखविली आहे. हे भिन्न भिन्न प्रकार असतां एकहिंदु [ ग्रंथकार ] याची समजूत हे त्रिविध नसून एकच आहेत, असी झाली आहे. हें त्याच्या लेखानेंच दिसून येतें.

त्याणें प्रथमतः चित्रगुप्तांची उत्पत्ती लिहून पुढें चांद्रसेनियांची लिहिण्याच्या आरंभीं " याविषयीं असी कथा " असें लिहिलें आहें. या वाक्यानें वरील चित्रगुप्त आणि हा ह्मणजे चांद्रसेनी हे दोघे ही एकच असें वाचकास दिसतें. तसेंच पुढें संकरजांची उत्पत्ती लिहिण्याच्या आरंभीं. " शूद्र कमलाकरांत यांच्या उत्पत्ती विषयीं " असें लिहिलें आहे. या वाक्यानें वरील दोघे आणि हे ह्मणजे संकरज असे तिघेही एकच असें वाचक समजतो. असी घोटाळ्याची समजूत होत असल्यामुळें गागा भट्ट याहीं कायस्थ धर्मदीपांत पहिल्या प्रकरणांत स्पष्टीकरण केलें आहे तें पाहिल्यानें " जातीभेद विवेकसार " काराची गैर समजूत उघडी पडते.

**श्रौत स्मार्त ह्मणति ज्या तेंकर्मचि वेद आणि शास्त्रोक्त ।**
**त्यासचि पूर्णत्वानें ह्मणती तें अग्निहोत्र सु प्रोक्तः १०५**

श्रौत ( श्रुति कथित ) स्मार्त [ स्मृति कथित ] हें कर्म वेद आणि शास्त्र उक्त ह्मणतात. त्या कर्माप्रमाणें आचरण करणें तें उत्तम पुरुषाहीं सांगितलें त्यासच अग्निहोत्र असें ह्मणतात १०५

**श्रौत स्मार्तादिकरुनि नवग्रह मखाद्य सर्व यज्ञांत ।**
**षोडश संस्कारांत हि श्राद्धादिक पितृयज्ञ संज्ञांत १०६**

श्रौत स्मार्त [ अग्निहोत्र ] आदिकरून नवग्रह मख [ यज्ञ ] आदिकरून यांत आणि सोळासंस्कारांत. आणि श्राद्धादिक पितृयज्ञांत. १०६

**वेदोपनिषन्मंत्रें यजिलें यज्ञांत राज वर्यांनी ।**
**वेदज्ञांनी याजित आहे तें कर्म सर्व आर्यांनीं.**

वेद आणि उपनिषत् मंत्रें करून राजश्रेष्ठाहीं यज्ञ केले. तें कर्म वेद जाणत्या श्रेष्ठ ऋषीहीं यजमान ह्मणजे यजन करणारा याच्या करितां वरणी घेऊन आचार्य होऊन केलें. १०७

हारेणुका महात्माधार तसा सह्यनग सु खंडाचा ।
घेउनि केला संग्रह वरद हि या मौलिइंदुखंडा १०८

हा ग्रंथ संग्रह रेणुका महात्माचा आणि तसाच उत्तम सह्याद्रिखंडाचा आधार आणि ज्याच्या मस्तकीं अर्धचंद्र आहे त्याचा वर घेऊन केला. १०८

तैसेंचि बृहत्स्कंद नाम पुराणांत सह्यनग खंडीं ।
अमलकि ग्राम महात्मीं सासष्ठाध्यायिं वदत कोदंडी १०९

त्या प्रमाणेंच बृहत्स्कंद नामक पुराणांत सह्याद्रीखंडांत अमलकी ग्राम [ माहूर ] महात्मांत सासष्टाव्या अध्यायांत कोदंडी [ देवाचा सेनापति होऊन कोदंड ह्मणजे धनुष्य धरणारा ) याणें सांगितलें.

उत्पत्ति कर्म आणिक अधिकारा वर्णिलें अशा शतका ।
पंकित मतिनें धरिजे या अंतः शुद्धकारका कतका ११०

उत्पत्ती, कर्म आणिक अधिकार हें वर्णन केलेलें आर्याशतक. जसें गढूळ पाण्यांत कतका ह्मणजे निवळीच्या बिया ह्मणतात त्या टाकिल्या ह्मणजे पाणी निवळून चिखल खालीं बसून शुद्ध ( निवळ ) पाणी वरतें राहतें तसे आपण कोण आपणास वेदाधिकार आहे कीं नाहीं अशी गढूळ ( पंकित ) मती ज्याची आहे त्याणी ती शुद्ध करून आपण वेदाधिकारी आहों असा निश्चय करून देणारें हें शतक हृदयांत धारण करावें [ वाचून पाहून अर्थ ध्यानांत ध्यावा. ]

हेमाद्रि पंडित पुसे कथि गौंडाचार्य जें सविस्तर तें ।
हेमाद्रि प्रबंधांतापंचविसाध्यायीं पाहिजे सुरतें. १११

हेमाद्रि पंडित पुसतो आणि गौंडाचार्य सांगतात तें सविस्तर जें लिहिलेलें आहे तो ग्रंथ हेमाद्रि प्रबंध याच्या अ पंचविसाव्या [ उत्तर चतुर्विंशति ] ह्मणजे चोवीसाव्या अध्यायांत दोन भाग आहेत त्यांत शेवटले भागांत लिहिलेलें आहे तें उत्तम रत जन जे आहेत त्याहीं पहावें. १११.

इति चांद्रसेनीय कायस्थ प्रभु धर्माधिकार संग्रहे. ।
पृथ्वी निःक्षत्रिय संशय निरसनं क्षत्रिय कुले ।

चांद्रसेनीय प्रभुकुलोत्पत्ति वेदोक्त धर्माधिकार।
कथनं नाम प्रथमोध्याय १

अर्थ—असा चांद्रसेनीय कायस्थ प्रभु धर्म आणि अधिकार संग्रहांत. पृथ्वी निःक्षत्रिय ह्मणजे क्षत्रिय—नाहींत असा जो संशय आहे, त्याचा नाश आणि क्षत्रियकुलांत चांद्रसेनीय कायस्थ प्रभुकुल उत्पत्ति, आणि वेदोक्त कर्म करण्याच्या अधिकार आहे. यांचें कथन केलेला पहिला अध्याय.

# अध्याय २ प्रारंभ.

**वेद चतुष्क चि ब्रह्मा वदला जें त्यांत होय ऋग्वेद ।**
**पाठक क्षत्रिय वर्ण क्रम धरितां यजु असा असे भेद. १**

चार वेद [ एक चतुष्क ] जें ब्रह्मदेव बोलला त्यांत ऋग्वेद ( पहिला मानिला आहे ) तो पाठ करणारा क्षत्रिय वर्ण आहे. आणि क्रम ( पहिला दुसरा तिसरा असें ] धरून पाहिलें असतां या कुलास यजुर्वेद आहे. याचा विस्तार करणें अवश्य आहे. ऋग्वेदांत कर्मारंभ सांगितला आहे. त्याचा विशेष विस्तार करून सांगितलेलें त्यांस " मीमांसा " शास्त्र ह्मणतात. सकल कर्मारंभ ऋग्वेद याकरितां कर्म कारणास ऋग्वेद आणि यजुर्वेदांत ज्ञान कथिलें आहें व तत्संबंधानें सर्व भेद वेगळे करून सांगितले आहेत त्यास " न्याय " शास्त्र ह्मणतात. न्यायानें वर्तविण्याचा अधिकार क्षत्रियांचा त्यांत अन्यायवर्ती जनांस दंड करण्याकरितां क्रूरत्व धनुष्य धारण करणें अवश्य. मनुस्मृति अध्याय १ श्लोक.

**प्रजानां रक्षणं दानमिज्याध्ययनमेवच ।**
**विषयेष्वप्रसक्तिश्च क्षत्रियस्य समासतः ८९.**

**अर्थ**—प्रजांचें पालन. ( त्यांच्या सुखादुःखाच्या संबंधीं लक्षदेऊन सुखी ठेवणें ) प्रजांचें रक्षण [ त्यांचे शत्रु, चोर, अन्यायानें दुखः देणार, मनुष्य पशु यांचें निवारण करणें ] दान, यजन, **अध्ययन** विषय [ शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, असे पंचधा ] यां पासून होणारे भोगोपभोगाविषयीं अत्यासक्त नसणें हीं क्षत्रियाचीं समासानें ( थोड्यांत सांगितलेलीं ) कर्में सांगतात. या करितां ब्राह्मण क्षत्रिय, वैश्य, यांच्या धर्मकर्म क्रमानें घेतलें असतां स्नान संध्यादि ब्रह्मकर्म करणें हें द्विज [ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ] यांचें काम जरीं आहें तरीं, स्नान संध्यादिकर्म ब्राह्मणानें केलेंच पाहिजे. न केलें तर भ्रष्टता येते, तशी क्रूरता धनुष्य धरणें हें न केलें असतां ब्राह्मणास भ्रष्टता येत नाहीं. क्षत्रियानें क्रूरत्व धनुष्य धरणें हें न केलें तर भ्रष्टता येते तशी स्नान, संध्यादिकर्म, हें कारण परत्वें न केलें असतां क्षत्रियास भ्रष्टता येत नाहीं. यामुळें कर्मारंभास ऋग्वेद आणि धनुर्धारणास यजुर्वेद असें आहें. किती वेदांचा अधिकार द्विजांस आहे तें पुढें पहा.

**ऋग्वेद ब्रह्मधर्मी क्षत्रिय धर्मींच ज्या यजुर्वेद ।**